**महाराष्ट्रातील उच्च शिक्षण :** भविष्यकाळासाठी सुसज्ज राहणे- नवीन कल्पना व नव्या वाटा

जुलै, २०११.

**डॉ.अनिल काकोडकर,**

डीएई- होमी भाभा अध्यासन प्राध्यापक

७ वा मजला,सेंट्रल कॉम्प्लेक्स,

बीएआरसी, तुर्भे,

मुंबई ४०० ०८५.

दिनांक :- ४ ऑगस्ट, २०११.

प्रिय श्री टोपे,

आपणास आठवत असेल की, महाराष्ट्र शासनाने उच्च व तंत्र शिक्षणाकडे लक्ष देण्यासाठी तीन समित्या घटित केल्या होत्या. या तीन समित्यांना, सह्याद्री अतिथिगृह येथील दिनांक ८ ऑक्टोबर, २०१० रोजीच्या पहिल्या बैठकीमध्ये तुमच्या मार्गदर्शनाचा लाभ मिळाला.

तीन समित्यांचे विचारार्थ विषय हे सर्वसमावेशक आहेत. उच्च शिक्षणाचा सुसंगत दृष्टिकोन विकसित करण्यासाठी, या सर्व तिन्ही समित्यांनी एकमेकांशी समन्वयाने काम केले. उदयास येणाऱ्या युगातील ज्ञान कार्यात महाराष्ट्राला अग्रस्थानावर ठेवून उच्च दर्जाच्या शिक्षणाचे मूळ महत्त्व लक्षात घेऊन याबाबतचा शासनाचा पुढाकार हा भविष्यवेधी आहे, असे आम्हास वाटते. आपण सद्यस्थितीत जेथे आहोत त्यामधून या नवीन उदाहरणांचा समावेश करण्यासाठी स्वतःला सक्षम बनविणे हे आपल्यासमोर आव्हान आहे. उत्कृष्टतेची उच्च पातळी गाठणे व ती साध्य करणे शक्य होणे या दोन गोष्टींपैकी एकीची दुसरीसाठी तडजोड न करता दोन्हींकडे लक्ष देण्याची गरज आहे. या आव्हानाच्या अवाढव्यतेविषयी समितीला जाणीव आहे आणि याबाबत प्रथम निर्णायक उपाययोजना करण्याची गरज आहे. असे करणे चांगले होईल की, आपल्यापैकी सगळयांना जे ध्येय साध्य करण्याची इच्छा आहे त्या ध्येयापर्यंत पोहोचण्यासाठी पायवाट तयार केल्यानंतर भविष्यात काही अतिरिक्त उपाययोजना करणे आवश्यक असेल.

समितीची अशी खात्री पटली आहे की, सध्याचे युग हे स्पर्धात्मक आर्थिक वृद्धीचे युग आहे, त्या प्रक्रियेत ज्ञानाचे वाढते महत्त्व आहे. युवकाच्या ए ३ (कोणीही, कधीही आणि कुठेही ) या तीन उदयोन्मुख संस्थांच्या सक्षमीकरणामार्फत भरीव विकासाच्या प्रक्रियेत आपल्या लोकसंख्येच्या काही भागाला संघटित

करून कामाला लावण्याची अत्यंत आवश्यकता आहे. उच्च शिक्षणाप्रति आपला दृष्टिकोन वळविण्यासाठी तात्काळ एखाद्या उदाहरणाची आवश्यकता असते. सद्यस्थितीत ते जेथे आहेत त्यापेक्षा अर्थपूर्णरीत्या उच्च पातळीवरच्या प्राथम्याच्या गुंतवणुकीची खात्री करून घेणे हे तितकेच महत्त्वाचे आहे. या क्षेत्रातील गुंतवणूक ही सद्य परिस्थितीत जास्तीत जास्त लाभांशदेखील मिळवून देईल. असे जर केले नाही तर आणि आपल्या युवक या मानवी भांडवलाला भरीव व अर्थपूर्ण उपजीविकेच्या सुसंधीच्या निकडीच्या प्रमाणानुसार सकारात्मकरीत्या कामाला लावले नाही तर याचे खूपच गंभीर नकारात्मक परिणाम होण्याचादेखील धोका आहे. शेवटी आपले आयुष्य पुढे चालू ठेवण्याकडे कल असणाऱ्या तंत्रज्ञानाच्या मागोमाग आपले मानवी मूल्य राखून ठेवण्याची आवश्यकताही सर्वात महत्त्वाची आहे.

शिखर समितीने उच्च शिक्षणाच्या व्यापक पैलूंवर विचारविमर्श केला आहे आणि इतर दोन समित्यांशी केलेला विचारविमर्शदेखील विचारात घेतला आहे. समितीने आता तिच्या अहवालाला अंतिम रूप दिले असून तिला (यासोबत जोडलेला) अहवाल सादर करण्यास आनंद होत आहे. अधिक व्यापक विषयांवर लक्ष केंद्रित करण्यासाठी समितीने तो पैलू जाणीवपूर्वक तपशीलवार व यथार्थदर्शी न ठेवता इतर दोन समित्यांकडे सोपवला आहे. त्या अर्थाने हे तीनही अहवाल एकच संपूर्ण अहवाल आहे, असे समजण्याची गरज आहे.

आपण व महाराष्ट्र शासनाने घेतलेल्या या पुढाकाराबद्दल आणि समितीच्या सदस्यांना सर्व महत्त्वाच्या कामामध्ये भाग घेण्याची सुसंधी दिल्याबद्दल समिती आपले आभार मानते. या कामात पुणे विद्यापीठ आणि उच्च व तंत्रशिक्षण विभाग यांच्याकडून मिळालेल्या सर्व सहाय्याबद्दल, समिती त्यांचेही आभार मानते. समितीचे अध्यक्ष, समितीच्या कार्यामधील सदस्यांच्या सढळ सहाय्याबद्दल व सहकार्याबद्दल आभारी आहेत.

आदरपूर्वक,

आपला विश्वासू,

| | | | |
|---|---|---|---|
| आर. ए. माशेलकर | राम ताकवले | अरुण निगवेकर | अनिल काकोडकर |
| विजय भाटकर | कुमुद बंसल | नितिन पुजार | |
| आर. के. शेवगावकर | राजन वेळूकर | संजय कुमार | |

श्री.राजेश टोपे,

मा.उच्च व तंत्रशिक्षण मंत्री,

महाराष्ट्र शासन

**महाराष्ट्रातील उच्च शिक्षण :** भविष्यकाळासाठी सुसज्ज राहणे- नवीन कल्पना व नव्यावाटा

## प्रस्तावना

महाराष्ट्र हा ज्यांमधून नवविचार प्रक्रिया उत्क्रांत होईल अशी नवीन आदर्श उदाहरणे विकसित करण्यात नेहमीच आघाडीवर राहिला आहे. सर्वात मोठे युवा बळ असणे, वेगाने वाढणारी अर्थव्यवस्था, अर्थव्यवस्था चालविणारा मूळ घटक म्हणून ज्ञानाचा उदय आणि महत्त्वाकांक्षेची उणीव भरून काढण्याची गरज, ही सर्व भारतातील दर्जेदार उच्च शिक्षणाच्या सर्वसमावेशनाबाबत तात्काळ कृती करण्यासाठी निदर्शकांना वेग देण्यास भाग पाडणारी कारणे आहेत. महाराष्ट्र शासनाने तातडीच्या कार्योचित उपाययोजना करण्याची गरज ओळखून राज्यातील उच्च शिक्षणाकडे व्यापकपणे लक्ष देण्यासाठी आणि विद्यमान व भावी आव्हानांसाठी तयारी करण्यासाठी तीन समित्या स्थापन केल्या आहेत.

व्यापक धोरणाच्या पातळीवर उच्च शिक्षणाकडे लक्ष देण्याच्या कामासाठी स्थापन केलेल्या या समितीने नवीन व इष्ट उच्च शिक्षणाच्या आदर्श उदाहरणापर्यंत पोहोचणे शक्य होईल, अशी प्रत्यक्ष पायवाट शोधण्यासाठी तपशीलवार विचारविमर्श केला होता. समितीच्या सदस्यांचे ज्ञान व अनुभव म्हणजे, या सदस्यांकडे ज्या कल्पना होत्या त्यांवरील परिपूर्ण तपशील उपलब्ध करून देण्याबरोबरच परंपरागत नैपुण्य व ज्ञान लवकरच समोर आणण्याच्या संधीद्वारे साकारलेले विचार असा होतो. याचा शेवट सुचविण्यात आलेल्या बदलांसाठी विनिर्दिष्ट उपाययोजना निवडण्यात होतो. अनुक्रमे कायदेशीर चौकट आणि राज्यात स्थापन केलेल्या विद्यापीठाची पुनर्रचना करणे याकडे लक्ष देण्यासाठी स्थापन केलेल्या इतर दोन समित्यांच्या पाठोपाठ या समितीने कामकाज करणे, हा याबाबतीतील मोठा लाभ होता. यामुळे या तीनही समित्यांना आपापल्या संबंधित कार्यक्षेत्रात आपल्या पद्धतीने सुसंगतपणे व एकोप्याने काम करणे शक्य झाले आहे.

इतर दोन अहवालांमध्ये समाविष्ट असलेल्या अधिक विर्निदिष्ट व तपशीलवार शिफारशींसह या समितीच्या शिफारशी आवश्यक रीतीने व्यापक स्तरावर करण्यात आल्या आहेत. समितीला हे मान्य आहे की, उत्कृष्टतेचा शोध ही एक सतत चालू राहणारी प्रक्रिया आहे आणि समितीला असे वाटते की, समितीने केलेल्या सूचनांमुळे राज्यातील उच्च शिक्षणाच्या भवितव्यावर महत्त्वाचा सकारात्मक परिणाम होईल.

या अहवालात, राज्याच्या समस्यांवर लक्ष केंद्रित करीत असतानाच जागतिक व राष्ट्रीय संदर्भात विविध प्रकरणांची पूर्वपीठिका, समस्या व आव्हाने यांची चर्चा केली आहे. याच्या रचनेद्वारे समितीने, इतर दोन समित्यांचे विचारविमर्श व शिफारशी लक्षात घेऊन व्यापक शिफारशी केल्या आहेत.

या अतिशय महत्त्वाच्या कामाबाबत समितीच्या सदस्यांवर विश्वास ठेवल्याबद्दल महाराष्ट्र शासनाचे आणि विशेषतः श्री राजेश टोपे, मा.उच्च व तंत्रशिक्षण मंत्री यांचे समिती आभार मानते. समितीच्या

विचारविमर्शात व कार्यात सहकार्य केल्याबद्दल समिती, पुणे विद्यापीठ आणि उच्च व तंत्रशिक्षण विभागाचेदेखील आभार मानते.

**कार्यकारी सारांश :**

महाराष्ट्रातील उच्च शिक्षणाचा स्तर व दर्जा यांच्यात वाढ करण्याच्या दृष्टिकोनातून शिफारशी करण्यासाठी महाराष्ट्र शासनाने संकीर्ण-२०१०/(१६०/१०)/विशि-४(भाग १), दि.२३ ऑगस्ट, २०१० याद्वारे एक समिती घटित केली आहे. या अनुषंगाने एक समिती कायदेशीर चौकटीच्या पुनर्विलोकनासाठी आणि दुसरी राज्यातील विद्यापीठाच्या चौकटीच्या पुनर्रचनेकडे लक्ष देण्यासाठी, अशा दोन इतर समित्यादेखील स्थापन केल्या होत्या. या तीन समित्यांनी परस्परांशी समन्वय ठेवून काम केले आहे.

**शैक्षणिक व सामाजिक-आर्थिक आदर्श उदाहरणः**

शिक्षण ही व्यक्तिमत्त्व विकासाची आणि सामाजिक आर्थिक परिवर्तनाची चावी आहे. योग्यरीत्या प्रयत्न केल्यास, शिक्षणामुळे आपले मोठया प्रमाणातील मनुष्यबळाचे भांडवल, संपूर्ण देशाची समावेशक वाढ होण्यासाठी मोठे रचनात्मक बळ म्हणून शक्ती प्रदान करू शकते. गुणवत्तापूर्ण उच्च व तंत्र शिक्षणामुळे एकाच पिढीतील गरीबातील गरीब कुटुंबाच्या आर्थिक दर्जात ठरीव प्रमाणात वाढ करण्याची क्षमता आहे. त्यामुळे पिरॅमिडच्या तळभागात असणाऱ्या लोकसंख्येतील श्रीमंत लोकसंख्येच्या लाभांशात जास्तीत जास्त वाढ होईल. नवीन तंत्रज्ञान, लोकसंख्येचे स्थानांतर, वाढती अर्थव्यवस्था आणि इतर अनेक विकास उपक्रम यांच्या प्रभावाचा परिणाम म्हणून आर्थिक-सामाजिक चित्र झपाटयाने बदलत आहे. जगभरातील अर्थव्यवस्थेत ज्ञान हा आता महत्त्वाचा घटक आहे. हा कल जागतिक व राष्ट्रीय पातळीवर वाढण्याचा संभव आहे. आपली सांस्कृतिक मूल्ये व परंपरा यांच्याशी संलग्न रहात असतानाच आपल्या सामाजिक-आर्थिक विकासाच्या चांगल्या हेतूच्या दृष्टीने बदलत्या आदर्शांच्या गरजेपोटी आपल्या शैक्षणिक पद्धतींची तात्काळ आखणी करण्याची गरज आहे. तथाकथित ए-३ (कोणीही, कुठेही व कधीही) यांच्याशी संबंधित समाज म्हणजेच एका बाजूने वेगाने उदयास येणारा आणि दुसऱ्या बाजूने अंकीय विभाजनापलीकडील अंकीयदृष्टया निरक्षर असलेला समाज, यामुळे मोठी सामाजिक-आर्थिक आव्हाने, निर्माण होतात.

**आपण आर्थिक वाढीच्या मार्गावर असल्याने ही तफावत त्वरेने कमी करण्यासाठी या बाजूने तात्काळ कारवाई करणे आवश्यक आहे अन्यथा**

केवळ वेग व गुणवत्ता यानुसार देण्यात आलेले समुचित शिक्षण व्यापक सहाय्य उपलब्ध करून देण्याच्या आधारे करता येणे

**अपरिपूर्ण आकांक्षामुळे परिणामस्वरूप गंभीर समस्या उद्‌भवतील व ज्या असणे अडचणीचे ठरेल असे संभाव्य धोके निर्माण होतील.**

शक्य आहे.आपण आर्थिक वाढीच्या मार्गावर असल्याने ही तफावत त्वरेने कमी करण्यासाठी या बाजूने तात्काळ कारवाई करणे आवश्यक आहे. अन्यथा अपरिपूर्ण आकांक्षांच्या परिणामस्वरूप गंभीर समस्या उद्‌भवतील आणि ज्या असणे अडचणीचे ठरेल, असे संभाव्य धोके निर्माण होतील. सुदैवाने शिक्षणात आधुनिक तंत्रज्ञानाचा व्यापकपणे वापर करण्याच्या शक्यतेमुळे पुरेशा वेगाने चांगले गुणात्मक शिक्षण अधिक विस्ताराने उपलब्ध करून देण्याची सुसंधी मिळवून दिली जाते; अशा प्रकारे या आव्हानांना तोंड देण्यासाठी आपण समर्थ ठरतो.

**उच्च शिक्षणाचे आव्हान :**

**उच्च शिक्षणामध्ये अध्ययन व शिष्यवृत्ती, ज्ञानाच्या विद्यमान मर्यादेपर्यंतचे सर्व मार्ग, अमर्याद ज्ञानाकडे नेणारे संशोधन, आधुनिक तंत्रज्ञान, समस्या सोडविण्याच्या नवीन कल्पना व उद्योग / संस्थांतील यांमधील सुसंधी आणि शेवटी समाजात संपत्ती निर्माण करणारी उद्योजकता, या सर्वांचा समावेश असला पाहिजे.**

उच्च शिक्षण स्पष्टपणे आपल्याला तिहेरी आव्हान आहे, ते म्हणजे, विस्तार, समावेश व उत्कृष्टता. उच्च शिक्षण उपलब्ध करून देण्याची त्रिवार मागणी भागविण्यासाठी विस्तार घडून आला पाहिजे. सर्वांसाठी शिक्षण उपलब्ध करून दिले पाहिजे, काही मान्यवरांसाठी शिक्षण नसावे म्हणून समावेशन आवश्यक घटक आहे. आणि हे साध्य करताना, उत्कृष्टतेबाबत कोणत्याही परिस्थितीत तडजोड करता येणार नाही. खरोखर उच्च शिक्षणाबाबतच्या आपल्या दृष्टिकोनात, आपल्या युवकांची संपूर्ण बुद्धिमत्ता वापरून आणि आकांक्षेमधून आपले मानवी ज्ञानभांडार जास्तीत जास्त उपलब्ध करून देणाऱ्या अनेक स्तरांचा समावेश असला पाहिजे. उच्च शिक्षणामध्ये अध्ययन व शिष्यवृत्ती, ज्ञानाच्या विद्यमान मर्यादेपर्यंतचे सर्व मार्ग, अमर्याद ज्ञानाकडे नेणारे संशोधन, आधुनिक तंत्रज्ञान, समस्या सोडविण्याच्या नवीन कल्पना व उद्योग/संस्थांतील सुसंधी आणि शेवटी समाजात संपत्ती निर्माण करणारी उद्योजकता, या सर्वांचा समावेश असला पाहिजे. या प्रयोजनाकरिता उद्‌भवणाऱ्या आर्थिक-सामाजिक स्थित्यंतरात नवीन ज्ञान व अर्थपूर्णरीत्या गुंतवून ठेवणारे कौशल्य यांनी प्रत्येक विद्यार्थ्याला समृद्ध करणारी अधिक सांगोपांग ज्ञानविषयक परिस्थिती निर्माण होण्यासाठी प्रत्येक विद्यापीठक्षेत्रात परिवर्तन होण्याची गरज आहे.

ज्ञानसंपन्न करण्यासाठी अशा अधिक सर्वंकष शिक्षणाच्या वातावरणाकडे जाण्याची सर्व विद्यापीठक्षेत्रांना गरज असेल. अधिक महत्वाचे म्हणजे समाजाची आणि आजूबाजूच्या उद्योगातील गती चालू ठेवतात असे शिक्षण व संशोधन कार्यक्रम, विद्यापीठक्षेत्राने वाढवले पाहिजेत आणि त्यांना मानवी

साधनांद्वारेच नव्हे तर विद्यालय क्षेत्रातील व विद्यापीठातील मोठया प्रमाणात संबंधित अभ्यासक्रम, संशोधन व नवीन कल्पना यामधून मार्गदर्शन व मदत केली पाहिजे.

**शिक्षणावर व परिसरातील गरजांच्या संबंधातील संशोधनावर लक्ष केंद्रित करू शकते असे हे प्रकरण आहे. एखादी व्यक्ती एका क्षेत्रापेक्षा अधिक क्षेत्र असलेले विद्यापीठ नजरेसमोर आणू शकेल, परंतु विद्यापीठ क्षेत्राशिवाय विद्यापीठाची कल्पना नजरेसमोर आणता येणार नाही.**

राज्यात उच्च शिक्षणातील प्रवेशाच्या संधी ह्या काही प्रमाणात असमान विभागल्या गेल्या आहेत. वर अधोरेखित केल्याप्रमाणे उच्च शिक्षण व विकास यांमध्ये आपल्याला निर्माण करण्याची इच्छा असलेल्या, विशेषतः उच्च शिक्षण व विकास यांच्यामधील मजबूत दुव्यांच्या संदर्भात अधिक समान विभागणी करण्याची आवश्यकता आहे. अशाप्रकारे अधिक विद्यापीठक्षेत्रांच्या गरजांवर अशाप्रकारे शिक्षण व संशोधन यावर लक्ष केंद्रित करू शकतील, असे हे प्रकरण आहे. एका विद्यापीठक्षेत्रापेक्षा अधिक विद्यापीठक्षेत्रे असलेले विद्यापीठ एखादी व्यक्ती नजरेसमोर ठेवू शकते. परंतु विद्यापीठक्षेत्राशिवाय विद्यापीठांची कल्पना नजरेसमोर ठेवता येणार नाही. विद्यापीठ हे विद्यापीठक्षेत्रातून विद्यापीठाच्या खऱ्या अर्थाने ज्ञानशाखेच्या संपूर्ण कक्षेमधून शैक्षणिक व संशोधन कार्यक्रमांचा पाठपुरावा करील आणि विद्यार्थ्यांना व विभागप्रमुखांना ज्ञानाच्या कक्षेकडे नेणाऱ्या संशोधनामध्ये व समस्या सोडविण्यामध्ये कार्यरत राहण्यासाठी आणि सभोवतालच्या समाजाला लाभ मिळवून देण्यासाठी मदत करील.

**शिक्षकांच्या भूमिकेचे पुनःसमायोजन करण्यामधून माहिती व संसूचना तंत्रज्ञान वस्तुतः परवडण्याजोग्या शिक्षणाच्या गुणवत्तेत आणि प्रवेशात वाढ करण्यासाठी पुढाकार घेऊ शकते.**

माहिती व संसूचना तंत्रज्ञानाचा परिणाम म्हणून संपूर्ण शिक्षण विषयक आदर्श उदाहरणाने मोठया स्थित्यंतरातून जाणे अपेक्षित आहे. ज्ञानसाधनसंपत्तीतून सर्वांना लाभ होण्याच्या तसेच त्यात भर घालण्याच्या आता संधी आहेत.

आपण विद्यार्थी-केंद्राभिमुख शिक्षणाकडे जात असल्याने ही एक मोठी शक्ती ठरेल. त्यांच्या भौगोलिक ठिकाणांकडे लक्ष न देता एकत्र काम करणारी व शिकणाऱ्या व्यक्ती किंवा गट यांच्यासोबत विद्यापीठाच्या परिसरातील गरजांशी संबंधित असणाऱ्या संशोधनासाठी व त्यातील समस्या

सोडविण्यासाठी खुल्या मंचांची स्थापना करणे, ही आता एक सुस्पष्ट संधी आहे. माहिती व संसूचना तंत्रज्ञानाने उच्च शिक्षणातील दूरशिक्षण पध्दतीमध्ये याआधीच महत्वाची भूमिका बजावली आहे. शिक्षण देण्यातील आणि मूल्यमापनाच्या प्रक्रियेतील माहिती व संसूचना तंत्रज्ञान मोठया प्रमाणात वापरण्यात आल्याचे ठळक उदाहरण आहे. सुसंगती साधलेल्या लवचिक पत आधारित मॉड्युलर अभ्यासक्रमाचा स्वीकार करून माहिती व संसूचना तंत्रज्ञानाने दुहेरी पध्दती व खुले विद्यापीठ प्रतिमाने यांच्यातील तफावत दूर होऊ शकते आणि अधिक सार्वत्रिकपणे सहभागात्मक व विद्यार्थी-केंद्राभिमुख शिक्षण दिले जाऊ शकते. तसेच शिक्षकांच्या भूमिकेचे पुन:समायोजन करण्यामधून माहिती व संसूचना तंत्रज्ञान वस्तुतः परवडण्याजोग्या शिक्षणाच्या गुणवत्तेत आणि प्रवेशात वाढ करण्यासाठी पुढाकार घेऊ शकते. समितीने म्हणून अशाप्रकारे राष्ट्रीय ज्ञान जाळे (एनकेएन) या अंतर्गत उपलब्ध करून दिलेल्या सुसंधीपासून लगेच प्रचालित करण्याच्या आणि त्यातून होणारे पुरेपूर लाभ घेण्याच्या आणि त्यात आवश्यक त्या स्थानिक व शेवटच्या टप्प्यातील पायाभूत सुविधांची भर घालण्याच्या गरजांवर जोर दिला आहे. त्याचबरोबर, शैक्षणिक आघाडीवर भविष्यातील आव्हाने दूर करण्यासाठी शिक्षणाची नवीन आदर्श उदाहरणे निर्माण करण्याचे प्रयत्न केले जावेत.

**नवीन इको-व्यवस्था पध्दती**

**चीनमध्ये जवळपास ३०० संशोधन पार्क आहेत. प्रत्येक विद्यापीठ क्षेत्रातील संशोधन पार्क व इन्क्युबेटर्स यात नवीन कल्पनेच्या आधारे व उद्योजकतेच्या आधारे परिपोषण करण्याची गरज आहे. ग्रामीण भागातील विद्यापीठक्षेत्र हे सिलेज म्हणून विकसित करण्यात यावे. त्याचप्रमाणे प्रत्येक विशेष आर्थिक क्षेत्रात एक विद्यापीठीय संशोधन केंद्र स्थापन करण्यात यावे.**

नवनवीन कल्पना ह्या जागतिक पटलावरील आपल्या स्पर्धात्मकतेचे मूळ आहे. विद्यापीठात करण्यात येत असलेल्या संशोधनावर आधारित नवीन मार्ग सुकर करण्यासाठी संशोधन पार्क व इन्क्युबेटर्सच्या स्वरूपात उद्योग व परिसरातील उद्योगांशी भागीदारी करण्याबाबत संस्थात्मक व्यवस्था केली पाहिजे. चीनमध्ये जवळपास ३०० संशोधन पार्क आणि यापेक्षा जास्त इनक्युबेटर्स आहेत. विद्याशाखा व विद्यार्थी यांच्या सहभागाने

एखादी कल्पना तयार करून ती अंमलबजावणीयोग्य उत्पादनामधून प्रत्यक्षात आणणे याव्यतिरिक्त उद्योजक व विद्यापीठक्षेत्रातील औद्योगिक संशोधकांची उपस्थिती आणि शैक्षणिक कार्यक्रमातील त्यांचा सहभाग हा एक सर्वांगिण शिक्षणाचा महत्वाचा घटक ठरतो. ग्रामीण भागातील विद्यापीठक्षेत्रातील परिसराशी परस्परसंबंध ठेवील आणि एकूण विकासात हातभार लावील असे सिलेज (अहवालातील तपशील पहा) म्हणून विकसित केले पाहिजे. या अर्थाने आजूबाजूचा परिसर विद्यापीठात करावयाच्या संशोधनाच्या निश्चितीसाठी पोषक भूमी ठरेल. कित्येक विशेष आर्थिक क्षेत्रांचा विकास करण्यात येत आहे. कलात्मक पातळीवर राज्यात अशा विशेष आर्थिक क्षेत्रात वापरण्यात येत असलेले तंत्रज्ञान सुस्थितीत ठेवण्यासाठी प्रत्येक विशेष आर्थिक क्षेत्रामध्ये स्थित असलेल्या विद्यापीठ संशोधन केंद्रामुळे विद्यापीठ व आजूबाजूचे उद्योग या दोहोंनाही लाभ होईल.

**संलग्न महाविद्यालये**

**संलग्न महाविद्यालयांना त्यांच्या कामगिरीनुसार स्वायत्तता देण्यात यावी, जी ठराविक कालांतराने घेतल्या जाणाऱ्या आढाव्याच्या अधीन असेल.**

तथापि, आजचे चित्र असे आहे की, उच्च शिक्षणावर, मोठया संख्येने असलेल्या संलग्न महाविद्यालयांचे वर्चस्व आहे. या महाविद्यालयांतून देण्यात येत असलेल्या शिक्षणाच्या गुणवत्तेत लक्षणीय फरक आहे. या महाविद्यालयांच्या कामांच्या आधारे त्यांना श्रेणीबद्ध स्वायत्तता प्रदान करण्यात येते, हे महत्वाचे आहे. अशी स्वायत्तता ही ठराविक कालांतराने घेण्यात येणाऱ्या आढाव्याच्या अधीन असली पाहिजे. त्यामुळे या स्वायत्त संस्थांना त्यांच्या स्वायत्ततेच्या परिमाणांमध्ये नवीन व काही चांगले करणे शक्य होईल आणि त्याचवेळेस विद्यापीठावरील भार कमी होईल. महाविद्यालयांतून व त्यानंतर कदाचित विद्यापीठांतून सुसंबध्दतेच्या प्रमाणात आणि विषयांनुसार शिक्षक/महाविद्यालये यांचे विद्यार्थ्यांना वाजवी पर्याय देऊन विशेष योग्यतेवर आधारित लवचिक मॉड्युलर अभ्यासक्रमाने विद्यार्थ्यांच्या गरजांनुसार शिक्षणाची अधिक सुसंगत आखणी करता येऊ शकेल. असा विद्यार्थी-केंद्राभिमुख दृष्टिकोन वस्तुतः आधुनिक माहिती व संसूचना तंत्रज्ञान व सामायिक प्रक्रिया याद्वारे पुढील शिक्षण आणखी समृद्ध करील.

## रोजगार मिळवून देण्याचे आव्हान

**शिक्षणानामुळे आपले विद्यार्थी हे काम मागणारे न राहता काम पुरवणारे होतील असा बदल होणे आवश्ययक आहे.**

प्रत्येक विद्यार्थ्याला उपजीविकेची हमी देण्यासाठी त्याप्रकारचे शिक्षण देण्याचे मोठे आव्हान आपल्यासमोर आहे. या प्रयोजनाकरिता, ज्ञानाचा आशय हा अद्ययावत व संबद्ध तर असला पाहिजेच, परंतु अधिक महत्वाचे म्हणजे, प्रत्येक विद्यार्थी, त्याची विद्याशाखा कोणतीही असो, तो अध्ययन करीत असलेल्या विषयांशी संबंधित कौशल्ये संपादन करण्यास समर्थ असला पाहिजे. वस्तुतः शिक्षणामुळे आपले विद्यार्थी काम मागणारे न राहता काम पुरवणारे होतील,असा बदल होणे आवश्यक आहे. आपल्या महाविद्यालयांचा एक भाग म्हणून कौशल्यपूर्ण शिक्षण व प्रशिक्षणाच्या सुविधा तसेच कौशल्यपूर्ण शिक्षणाचा समावेश असलेल्या सुविधा निर्माण करण्याचे आम्ही प्रस्तावित केले आहे. खाजगी कुशल शिक्षण पुरविणाऱ्यांसह उत्साहाने काम करणाऱ्यांनादेखील शोधून काढले पाहिजे. प्रत्येक ज्ञानशाखेकडे संबंधित कौशल्ये असतील याची आपण खात्री केली पाहिजे. समितीने विद्यमान अभ्यासक्रमात जादा दाखल करावयाचे कौशल्यपूर्ण शिक्षण व प्रशिक्षण यासाठी सर्वसमावेशक चौकटीची शिफारस केली आहे. अशा चौकटीमधील मूळ घटक हे, विद्यापीठ मंडळे, जिल्हे, शिक्षण संस्था व महाविद्यालये यांच्यासारख्या बहुविध पातळयांवर हितसंबंधित भागीदारी व भावी नियोक्ते, विकास नियोजक, उद्योग संघ, संस्था गट व विद्यापीठ व महाविद्यालये यांच्यामध्ये कायम दुवे निर्माण करतील.

## विद्याशाखेची गतिक्षमता आणि मूल्य रूपांतरणाच्या ज्ञानकौशल्याचा विकास

**काही वर्षांसाठी तरी वाढीव कालावधीकरिता विद्याशाखेची गतिमानता सहयोगी संस्थेकडे देणे सुकर होईल अशा चौकटीद्वारे वास्तविक जीवनातील वर्धनक्षम ज्ञान योजनेत रूपांतर करणे शक्य होईल आणि त्यामुळे विद्यापीठाचे कार्यक्रम समृद्ध होतील.**

विद्यापीठाचे कार्यक्रम, सहयोगी संस्थांमधील संपादित केलेल्या ज्ञानाचे कामाच्या ठिकाणी वास्तविक जीवनातील वर्धनक्षम योजनेमध्ये रूपांतर करण्यात कार्यरत असणाऱ्या विद्याशाखेद्वारे खूपच जोमदार बनू शकतील. यासाठी, काही वर्षांचा कालावधी वाढविण्यासाठी विद्याशाखेची गतिक्षमता इतर सहयोगी संस्थांकडे देणे सुकर होईल अशी चौकट तयार करणे गरजेचे

आहे. अशा सहयोगी संस्था या उद्योग, संशोधन व रचना, प्रयोगशाळा, सामाजिक विकासामध्ये कार्य करणारी स्वयंसेवी संघटना किंवा प्रकल्प ठरवून देण्याचे काम हाती घेण्याचा हेतू असणारी एखादी व्यक्ती किंवा व्यक्तींचा गट हे असू शकतील. विद्यापीठात विकसित झालेल्या अंतर्गत ज्ञानाच्या अर्थान्वयनाचा परिणाम म्हणून उपार्जित लाभाव्यतिरिक्त असे ज्ञान वापरण्यामुळे प्रक्रियेमध्ये आवश्यक असणाऱ्या मृदु कौशल्याची प्रत्यक्ष अंमलबजावणी व विकास यासंबंधातील अनुभवात वाढ करणे देखील विद्याशाखेला शक्य होईल. विद्यापीठामध्ये अशी अनुभवी विद्याशाखा असणे हे विद्यापीठात सर्वंकष शिक्षणाचे वातावरण निर्माण करणारी अतिरिक्त संपत्ती असेल. अशा रूपांतरणाच्या प्रक्रियेत अंतर्भूत असलेली मोघम कौशल्ये शिकण्यासाठी विद्यार्थ्यांकरिता असणाऱ्या संधीकडे दुर्लक्ष करता येणार नाही.

**स्वायत्त परीक्षा मंडळे**

**विषय व शिक्षक/महाविद्यालये यानुसार विद्यार्थ्यांना योग्य ते पर्याय देऊन महाविद्यालये आणि त्यानंतर कदाचित विद्यापीठे यामधून संबंधित पदवी देणाऱ्या लवचिक विशेष योग्यतेवर आधारित बहुआयामी (मॉड्युलर) अभ्यासक्रम विद्यार्थ्यांच्या गरजांनुसार शिक्षण देऊ शकेल.**

विद्यापीठांवर आजच्या घडीला परीक्षांचे व त्या संबंधित कार्यक्रमांचे आयोजन करण्याचे प्रचंड दडपण आहे. जेथे ज्ञानात सातत्याने वाढ होत आहे आणि समाजाच्या भल्यासाठी या ज्ञानाचा वापर करण्याचे मार्ग आहेत आणि विद्यार्थी व विद्याशाखा यांना संशोधन करण्याच्या कामात पूर्णपणे गुंतवून ठेवणारे वातावरण आहे तेथ शिक्षण केंद्र असणे अपेक्षित आहे. परंतु वरील भूमिकेला लक्षणीय बाधा येत आहे. म्हणून कारणामुळे अशा विद्यापीठाच्या प्राथमिक विद्यापीठाची आवश्यकता व मार्गदर्शन यानुसार विद्यापीठाच्या स्वायत्त परीक्षा मंडळाकडे परीक्षांचे आयोजन करण्याचे काम सोपविण्याचे प्रस्तावित केले आहे. अशी मंडळे कालबद्ध रीतीने मूल्यमापनाकरिता आवश्यक असणाऱ्या

**विद्यापीठाच्या आवश्यकतेनुसार व मार्गदर्शनानुसार परीक्षांचे आयोजन करण्याचे काम स्वायत्त परीक्षा मंडळाकडे सोपविण्यात येईल.**

गरजा भागविण्यासाठी साधनसंपत्तीचा व तंत्रज्ञानाचा योग्य तो वापर करतील. लवचिक विशेष योग्यतेवर आधारित बहुआयामी (मॉड्युलर) संरचना आणि माहिती व संसूचना तंत्रज्ञान यासह विद्यार्थ्यांना आवडीची वेळ, विषय, शिक्षक / महाविद्यालये इत्यादीनुसार उपलब्ध असणारा लवचिकपणा सातत्याने वाढविता येणे शक्य होईल. हे स्पष्ट आहे की, मूल्यमापनाचे उद्दिष्ट आणि अंतिम न्यायनिर्णय तसेच पदवीदान हे विद्यापीठाच्या कक्षेतच राहील.

**कामाचा आढावा**

अधिक उत्कृष्टता साध्य करण्याच्या निरंतर प्रयत्नांचा एक भाग म्हणून शैक्षणिक संस्थांनी मान्यवर व्यक्तींच्या गटाद्वारे बाह्य पाहणीचा सर्वसमावेशक आढावा स्वतःच ठराविक कालांतराने घेतला पाहिजे. विद्यापीठ, विभाग, महाविद्यालये व विद्याशाखा यांच्यासह विविध स्तरावर असे आढावे घेतले गेले पाहिजेत. बाह्य पाहणीच्या आढाव्याची विद्याशाखा व कर्मचारी यांना त्यांचे काम सातत्याने सुधारण्यासाठी, त्यांना प्रेरित करण्यासाठी, एक यंत्रणा असली पाहिजे. अशी प्रेरणा ही मान्यतेच्या तसेच अधिक चांगले काम करण्याची संधी व सहाय्य या स्वरूपात असू शकेल. पैशाच्या रूपात बक्षीस देण्यामधून प्रेरणा देण्याची पद्धत वापरताना एखाद्या व्यक्तीच्या संज्ञान क्षमतांची खात्री करून घेण्यासाठी भाग पाडले जाणार नाही. परंतु यामुळे बऱ्याच अंशी नावीन्यपूर्ण आशय आणि खरे योगदान देण्याची इच्छा व स्वयंसिद्धता ओळखून तिचे

**विद्यापीठ व महाविद्यालये यांनी मान्यवरांच्या एखाद्या बाह्य गटाद्वारे सर्वसमावेशक आढावा घेण्यासाठी ठराविक कालांतराने स्वतःचे परीक्षण केले पाहिजे. विद्यापीठाच्या सर्व कार्यांचा समावेश करून मंडळाकडून गुणवत्तेची हमी देणाऱ्या चौकटीद्वारे बाह्य मान्यवरांच्या आढावा प्रक्रियेने आधार दिला पाहिजे.**

संवर्धन करण्यात येईल, याची योग्य ती काळजी घेतली पाहिजे. हे सुपिरिचित आहे की खूपच पारंपरिक आणि सक्तीची परिणामात्मक बक्षीस पद्धती केवळ वारंवार उद्‌भवणाऱ्या परिस्थितीमध्ये काम करते आणि जेव्हा संज्ञानावर आधारित कामाचा समावेश असेल तेव्हा तिचा कल उत्पादनक्षमतेच्या विरोधात असतो.

**पैशाच्या रूपात बक्षीस देण्यामधून प्रेरणा देण्याची पद्धत वापरताना एखाद्या व्यक्तीच्या संज्ञान क्षमतांची खात्री करून घेण्यासाठी भाग पाडले जाणार नाही. परंतु यामुळे बऱ्याच अंशी नावीन्यपूर्ण आशय आणि खरे योगदान देण्याची इच्छा व स्वयंसिद्धता ओळखून तिचे संवर्धन करण्यात येईल, याची योग्य ती काळजी घेतली पाहिजे.**

**स्वायत्तता व अधिकार प्रशासन :-**

जागतिक दर्जाच्या विद्यापीठाचे प्रमाणचिन्ह हे नवीन कल्पना काहीशा वेगळया पद्धतीने मांडण्याच्या गरजेला तात्काळ प्रतिसाद देऊ शकेल अशा लवचिक प्रशासन प्रतिमानानुसार तिने स्वायत्त कारभार करणे हे आहे. अशी प्रशासन यंत्रणा ही केवळ मान्यवरप्रेरित व स्वतंत्र निधीद्वारे दाननिधी दिलेली असावी. वस्तुतः बाह्य बुद्धिमंतांना आकर्षून घेण्यासाठी प्रभावी चुंबक ठरू शकेल अशी मोठया प्रमाणातील बुद्धिमत्ता धारण करणारे विद्यापीठ हे केवळ अशा प्रशासनामधूनच शक्य आहे. अशा एखाद्या स्वायत्त यंत्रणेने, विद्यापीठाला जे आर्थिकदृष्टया व सक्रिय सहभागाने आधार देतात

**जागतिक दर्जाच्या विद्यापीठाचे प्रमाणचिन्ह हे नवीन कल्पना काहीशा वेगळया पद्धतीने मांडण्याच्या गरजेला तात्काळ प्रतिसाद देऊ शकेल अशा लवचिक प्रशासनप्रतिमानानुसार तिने स्वायत्त कारभार करणे हे आहे. अशी प्रशासन यंत्रणा ही केवळ मान्यवरप्रेरित व स्वतंत्र निधीद्वारे दाननिधी दिलेली असावी.**

अशा विद्यार्थी, संस्था, उद्योग व शासन, यांसारख्या हितसंबंधितांबरोबर कामात गुंतवून घेतले पाहिजे. ज्ञानाच्या आघाडीवरील प्रगती, विकासात्मक प्रतिमानांची निर्मिती आणि उपयोजने, विशेषतः परिसरातील आणि अधिक अर्थपूर्ण रीतीने सामाजिक-आर्थिक परिवर्तन पुढे नेऊ शकणाऱ्या स्वयं अधिकार प्रदत्त युवकाला घडविणाऱ्या उदयोन्मुख ज्ञानाधारित समाजातील सामाजिक-आर्थिक उत्क्रांती घडविणारा सहायक म्हणून विद्यापीठांची आपल्या हितसंबंधितांप्रति उच्च ध्येयाच्या स्वरूपात जबाबदारी असली पाहिजे. तरी ही स्वायत्तता व प्रशासन हे, आपल्या विद्यापीठांना उच्च पातळीवर नेणारे मूळ घटक आहेत. यासंदर्भात समितीने थोर विख्यात शिक्षणतज्ज्ञ, संशोधक, शास्त्रज्ञ, तंत्रज्ञानातील तज्ज्ञ व्यवसाय व उद्योग यातील तज्ज्ञ आणि आर्थिक तज्ज्ञ यांची मिळून बनणारी महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण व विकास (माहेड) परिषद स्थापन करण्याचे सुचविले आहे.

**ज्ञानाच्या आघाडीवरील प्रगती, विकासात्मक प्रतिमानांची निर्मिती आणि उपयोजने, विशेषतः परिसरातील आणि अधिक अर्थपूर्ण रीतीने सामाजिक-आर्थिक परिवर्तन पुढे नेऊ शकणाऱ्या स्वयं अधिकार प्रदत्त युवकाला घडविणाऱ्या उदयोन्मुख ज्ञानाधारित समाजातील सामाजिक-आर्थिक उत्क्रांती घडविणारा सहायक म्हणून विद्यापीठांची आपल्या हितसंबंधितांप्रति उच्च ध्येयाच्या स्वरूपात जबाबदारी असली पाहिजे.**

**महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण व विकास परिषद ही, शिक्षणतज्ज्ञ, शास्त्रज्ञ व तंत्रज्ञानातील तज्ज्ञ, समाज विकासातील व उद्योगातील तज्ज्ञ व्यक्ती यांनी मिळून बनलेली असेल आणि ती राज्यातील उच्च शिक्षण संस्थांकडे लक्ष ठेवील त्यांना मदत व मार्गदर्शन करील.**

माहेडला (MAHED) समुचित व पुरेशा स्वायत्ततेसह एकमेव स्वयंसिद्ध स्वतंत्र कायदेशीर संस्था बनविण्यात येईल. तिला शासनाकडून वित्तपुरवठा करण्यात येईल. राज्य शासनाकडून सरकारी विद्यापीठांच्या अर्थव्यवस्थेसाठी आणि मानवी सक्षमीकरण व विकास या उद्दिष्टांच्या अंमलबजावणीसाठी हे एक साधन ठरेल. एका अर्थाने माहेड (MAHED) ही शासन व विद्यापीठ यांमधील एक दुवा ठरेल आणि ती विद्यापीठांवर देखरेख ठेवेल. त्यांना मार्गदर्शन आणि मदत करेल. तसेच विद्यापीठातील कार्यक्रम व प्रादेशिक विकास यामध्ये सांगड घालण्यात मदत करील.

माहेड (महाराष्ट्र राज्य उच्च  शिक्षण व विकास परिषद)ही कुलगुरुची नियुक्ती तसेच राज्यातील उच्च शिक्षणाच्या संरचनेला मदत करण्यासाठी  स्थापन करावयाच्या इतर संस्थांच्या प्रमुखांची नियुक्ती करण्याच्या बाबींमध्ये मध्यवर्ती भूमिका पार पाडेल. महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण व विकास परिषदेला एका बाजूने राज्यपालांच्या अध्यक्षतेखालील शिखर सल्लागार समिती नि पर्यवेक्षी परिषद आणि दुसऱ्या बाजूने व्यापक पायावर आधारित विद्या व  विकास परिषद यांद्वारे मार्गदर्शन केले जाईल. महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण व विकास परिषद, जी पदवीपूर्व मूल्यमापन सेवांना मदत करणे, ज्ञान व त्यासंबंधित सेवांचे जाळे निर्माण करणे, गुणवत्तेची हमी व अधिस्वीकृती, शक्ती प्रदान करणाऱ्या सेवासंबंधातील खुली साधने यांसह विद्यापीठांना सहाय्य  करणारे  इतर  कार्यक्रम आयोजित करील व अशा संस्थांना मदत करील. या कार्यक्रमांचे व्यवस्थापन करण्यासाठी संस्थात्मक चौकट निर्माण करण्याची आपल्याला गरज आहे. महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण व विकास परिषदेने तिची संबंधित कर्तव्ये पार पाडताना या संस्थांची देखरेख व त्यांचे मार्गदर्शन केले पाहिजे.

**विद्यापीठातील व विद्यापीठाबाहेरील नामवंत व्यक्तींनी निर्णय दिल्याप्रमाणे ज्यांनी आपली योग्यता सिद्ध केली आहे, अशा विद्याभ्यासींच्या हातात विद्यापीठाचे काम सोपविले पाहिजे. विद्यापीठात जो प्रघात असेल, अशा निवडणुकांच्या प्रक्रियेऐवजी ही एक परिपूर्ण तत्सम प्रक्रिया आहे. समिती अशी शिफारस करते की, निवडणुका टाळण्यात याव्यात.**

विद्यापीठातील व विद्यापीठाबाहेरील नामवंत व्यक्तींनी निर्णय दिल्याप्रमाणे ज्यांनी आपली योग्यता सिद्ध केली आहे, अशा विद्याभ्यासींच्या हातात विद्यापीठाचे कामकाज सोपविले पाहिजे. विद्यापीठात जो प्रघात असेल अशा निवडणूक प्रक्रियेपेक्षा ही एक परिपूर्ण समान प्रक्रिया आहे. समिती शिफारस करते की,  त्यासोबत निवडणुका घेण्याचे टाळण्यात यावे. आणखी असे की, विद्यापीठांचे नियमन करणाऱ्या, परिणामात्मक, न बदलता येणाऱ्या आणि विशिष्ट अटींपेक्षा, नियम निर्धारित केले पाहिजेत. वस्तुनिष्ठता ही महाविद्यालयातील व्यापक नियम व निर्णय घेणारे

सहव्यवसायी यांनी केलेल्या अर्थउकलीवर विसंबून असली पाहिजे. सहव्यवसायिकांच्या आस्थापनेतून तशीच प्रक्रिया अनुसरता येणे शक्य आहे. या महत्त्वाच्या सुधारणा घडवून आणण्यासाठी विद्यापीठाच्या अधिनियमात बदल करणे आवश्यक आहे.

समितीला असे वाटते की, सद्यस्थितीत विद्यापीठांना मुख्यतः शासनाकडून मिळणाऱ्या वित्त पुरवठयावर अवलंबून राहणे आवश्यक असेल. नवीन विद्यापीठक्षेत्रांच्या विकासासाठी रुपये २००+ कोटी इतक्या नियतव्ययाची गरज असेल. प्रत्येक महाविद्यालयाला दरवर्षी रुपये १०-१५ कोटी इतक्या आवर्ती मदतीचीदेखील गरज असेल.अधिकाधिक विद्यापीठांनी साधनसंपत्ती उभारण्याचा आणि पाहिजे तितक्या मोठया प्रमाणात दाननिधी निर्माण करणे तसेच चालू असणाऱ्या नवीन शैक्षणिक व विकास कार्यक्रमांना मदत करण्याचा आटोकाट प्रयत्न केला पाहिजे. स्वायत्त प्रशासन यंत्रणेद्वारे योग्य प्रमाणात पाठिंबा दिलेल्या शैक्षणिक जोरानुसार व विकास क्षमतेनुसार मोठया विश्वासाने, असे वाटते की, साधनसंपत्ती वाढविण्याच्या विद्यापीठाच्या क्षमतेत महत्त्वपूर्ण सुधारणा होईल. अंतरिम कालावधीत साधनसंपत्ती मिळवण्याच्या काही कल्पना समितीने प्रस्तावित केल्या आहेत. यामध्ये विद्यापीठांना त्यांची विद्यापीठक्षेत्रे, उच्च शिक्षणासाठी वित्त व्यवस्था करण्यासाठी कर आकारणी आणि राज्य व स्थानिक करातून सूट यासंबंधात विशेष नियोजन प्राधिकरणाचा दर्जा देणे, यांचा समावेश आहे.

**विद्यापीठांना त्यांची विद्यापीठ क्षेत्रे, उच्च शिक्षणासाठी, वित्त पुरवठा करण्यासाठी उपकर आकारणे आणि राज्य व स्थानिक करामधून सूट देणे यासंबंधात साधनसंपत्ती उभारण्याच्या काही मार्गांनी विद्यापीठांना विशेष नियोजन प्राधिकरणाचा दर्जा देणे.**

विद्यापीठांनी या क्षेत्रातील व्यावसायिक क्षमतांमध्ये वाढ करून त्यांची वित्त व्यवस्थापन यंत्रणा बळकट केली पाहिजे. शासनाचे संनियंत्रण व लेखापरीक्षा यांशिवाय विद्यार्थ्यांना, त्यांना मिळणाऱ्या शिक्षणाचा खर्च माहीत असला पाहिजे आणि दान देणाऱ्या व्यक्तींना त्यांनी दान केलेल्या रकमेचा कसा वापर होतो, हे माहिती करून दिले पाहिजे. विद्यापीठाला मिळणाऱ्या कोणत्याही मदतीचा चांगल्या व उद्देशपूर्ण कामासाठी वापर करण्यात येईल याबद्दल निश्चितच पुरेसा आत्मविश्वास असला पाहिजे.

**खाजगी शिक्षण क्षेत्र व परदेशी विद्यापीठांचा प्रवेश**

**सर्वोत्तम संस्थांना प्रवेश देणे व संशयास्पद गुणवत्ता, योग्यता नोंद व अधिकारपत्रे असणाऱ्या संस्थांना प्रवेश घेऊ न देणे, या तीव्र जाणीवेतून नियमन करणे आवश्यक आहे.**

भारतातील मोठया संख्येतील युवक हे त्यांच्या रोजगाराच्या संधी वाढतील अशा गुणवत्तापूर्ण शिक्षणाच्या शोधात आहेत. उच्च शिक्षणात खाजगी क्षेत्र खूपच मोठया प्रमाणात सहभागी झाले आहे. याअगोदरच असे परिणाम दिसले आहेत. आपल्या लोकसंख्येचा मोठा भाग हा, अनेक प्रगत देश, ज्यांना त्यांची अर्थव्यवस्था टिकवून ठेवण्यासाठी व वाढविण्यासाठी बाहेरील मनुष्यबळाची गरज आहे, अशा देशांना ही खूपच फायद्याची गोष्ट ठरली आहे. भारतातील उच्च शिक्षण देणाऱ्या तुलनात्मकदृष्टया आकर्षून घेणाऱ्या अर्थव्यवस्थेतील हा वाढता रस, हा भारतात परदेशी विद्यापीठांना प्रवेश करून देण्याच्या स्थितीकडे नेतो, तर आपण भारतातील उच्च शिक्षणाच्या क्षेत्रात परदेशी विद्यापीठांना प्रवेश देण्याचे महत्त्व ओळखण्याची योग्य ती काळजी घेऊ शकल्यास, अशा विद्यापीठांच्या कामांच्या क्षमतेचा प्रभाव, हा स्वतःच महत्त्वाचा ठरतो. यामुळे निःसंशयपणे चित्र पालटले जाईल, परंतु त्याकरिता अपुरी गुणवत्ता असणाऱ्या व सारासार विचार न करणाऱ्या संस्थांना भारतीय उच्च शिक्षणाच्या क्षेत्रात प्रवेश दिला जाऊ नये, याबाबत योग्य ते कठोर परिश्रम घेऊन हे चित्र पालटले पाहिजे. सर्वोत्तम संस्थांना प्रवेश देणे व संशयास्पद गुणवत्ता, योग्यतेची नोंद व अधिकारपत्रे असणाऱ्या संस्थांना काळजीपूर्वक प्रवेश घेऊ न देणे आवश्यक आहे. स्वयंअर्थसहाय्यित विद्यापीठे स्थापन करण्यासाठी प्रायोजक संस्था म्हणून "कंपनी अधिनियम, १९५६" याच्या कलम २५ अन्वये, नोंदणीकृत कंपनीला परवानगी देणे ही एक आणखी महत्त्वाची सुरुवात असेल. यामुळे योग्य दिशेने पावले उचलण्यास मदत होईल व ती पुढे चालत राहतील. आपल्यासारख्या मोठ्या व विभिन्नता असणाऱ्या देशातील उच्च शिक्षणाची मोठया प्रमाणातील मागणी लक्षात घेऊन योग्य ते नियंत्रण व संतुलन ठेवून वेगवेगळया लोकांना तसेच अर्थसहाय्यित खाजगी विद्यापीठांना प्रोत्साहन देण्याची

गरज आहे. काही कालावधीनंतर, एखाद्याला उच्च शिक्षणातील खाजगी गुंतवणुकीला चालना देण्यासाठी विशेष अधिनियमाद्वारे कंपन्यांसाठी चौकट तयार करता येणे शक्य होईल.

***या सर्वोच्च समितीच्या कामकाजाचा इतर दोन समित्यांच्या कामकाजासोबत चांगल्या प्रकारे समन्वय साधण्यात आला आहे. त्यांच्या विमर्शांचा व शिफारशींचादेखील संक्षिप्त सारांश अनुक्रमे विभाग १७ व १८ मध्ये समाविष्ट केला आहे. या सर्वोच्च समितीच्या अहवालात इतर दोन समित्यांच्या अहवालात समाविष्ट केलेल्या व्यापक शिफारशी व अधिक तपशीलाची नोंद घेतली आहे. विभाग १८ मध्ये सर्वोच्च समितीच्या संपूर्ण शिफारशी अंतर्भूत केल्या आहेत.***

## महाराष्ट्रातील उच्च शिक्षण : भविष्य काळासाठी सुसज्ज राहणे- नवीन कल्पना व नव्या वाटा

## विषय सूची

९. ज्ञानधिष्ठित अभिनव उपक्रम, माहिती व संसूचना तंत्रज्ञान सहाय्यभूत समाज, ए३ संबंधित समाज

१०. विद्यापीठ क्षेत्र : भारताच्या भावी अभिनव इको-व्यवस्थेचा बहुउद्देशीय आधार

- सर्वसमावेशक इको-व्यवस्था
- अध्ययन आणि संशोधनाच्या पायाभूत सूविधा
- सामाजिक बांधिलकीचा नमुना
- औद्योगिक आणि व्यवसाय संस्थांमध्ये काम करणे
- विद्यापीठ क्षेत्रांमध्ये एखाद्या विद्यापीठ यंत्रणेच्या दृष्टिकोनाची व्याख्या करणे
- अंतर्गत विद्याशाखांवर लक्ष केंद्रीत करणे
- संलग्न असणाऱ्या महाविद्यालयाचा पाठिंबा व विकासविषयक भूमिका
- तंत्रज्ञानाचा झपाट्याने प्रसार होत असल्यामुळे स्वयं अध्ययन पद्धती तयार करणे
- संस्कृती म्हणून ३६० (संपूर्ण) मूल्यमापन
- बक्षीस पद्धती
- साधनसंपत्ती उभारण्याची क्षमता: यथोचित दर्जा निर्देशांक
- माहिती संसूचना तंत्रज्ञान (आयसीटी) : मूळापासून सुधारणा करण्याची संधी

११. संलग्न महाविद्यालये: स्वायत्तता लवचिकता आणि कौशल्य विकास निष्पत्ती याबाबत

- स्वायत्तता
- पदव्युत्तर अध्यापन व संशोधन
- रोजगार क्षमतेसाठीच्या कौशल्यावर भर
- पतप्रमाणता

१२. कौशल्याधारित विकास संधींच्या भरीव वाढीसाठी कार्यक्रम

- केंद्रक म्हणून महाविद्यालय
- नोकरी कौशल्याशी सांगड घालणे
- बहुविध हितसंबंधित व्यक्तींचा व्यवस्थापन निकाय
- निधी उभारणे : उद्योग-शासकीय ऐक्यसंबंध व शासकीय प्रकल्प यांच्यात सांगड घालणे
- कौशल्य निविष्टींची व्याख्या करणे आणि मापन करणे
- दिशादर्शक उपक्रम म्हणून कौशल्य विकासास सहाय्यभूत करणे

१३. स्वायत्त परीक्षा मंडळे : मूल्यमापन प्रक्रिया व पद्धतीत सुधारणा

१४. विद्यापीठांमधील आपले श्रेष्ठत्व : शासन पद्धती, संशोधनात्मक व गुणवत्ता दर्जा

- विद्याविषयक सुक्ष्मावलोकनावर आधारित केलेले व्यवस्थापन
- स्वायत्ततेला निधींचा आधार
- शासनामार्फत स्थूलमानाने हितसंबंधित व्यक्तींचा सहभाग
- मॉड्यूलर क्रेडिट : मोहिमेअंतर्गत विद्यापीठ पाठ्यक्रम व सहकार्य
- एकत्रीकरणावर दृष्टिक्षेप
- विद्यापीठ : सर्वांगीण, प्रायोगिक, सामाजिक विकास
- कौशल्यविकासावर लक्ष केंद्रित करणे : सर्वांसाठी वरवरचे मूल्य काढण्यासाठी
- आढावा : वास्तव तपासणी आणि नव्याने दृष्टिक्षेप

१५. शासन व विद्यापीठ यांच्यामध्ये दुवा साधणे : विद्यापीठांकरिता निरंतर आधार देणारी गुंतवणूक आणि निधी देणारे मॉडेल यांच्यामार्फत विकासाला चालना देण्यासाठी ज्ञानाचा वापर करणे.

महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण व विकास आयोग : विद्यापीठ यंत्रणा अग्रगण्य ठरण्यासाठी व तिचे नियमन करण्यासाठी प्रस्तावित संरचना.

विद्यापीठांकरिता निरंतर आधार देणारी गुंतवणूक आणि निधीकरण मॉडेल.

१६. माहिती व संसूचना तंत्रज्ञान-सहाय्यभूत उच्च शिक्षण आराखडा

- माहितीविषयक सेवा
- प्रशासनिक व सुविधा देणाऱ्या सेवा.
- अध्ययनविषयक सेवा
- सहभागी होता येईल आणि सहयोग देता येईल अशा सेवा

१७. सरकारी विद्यापीठांकरिता नवीन अधिनियम

क. प्रादेशिक ओळखीचा आदर राखून समावेशकता

ख. जागेचे निर्बंध नसणारे दर्जात्मक शिक्षण

ग. एकसंधी जागतिक शैक्षणिक संरचना

घ. विकेंद्रीकरण, लहान ते सुंदर

१. स्वायत्त महाविद्यालये

२. अधिकार प्रदान केलेली स्वायत्त महाविद्यालये

३. अधिकार प्रदान केलेली स्वायत्त समूह संस्था

ड. नवोपक्रमासाठी स्वातंत्र्य

च. तंत्रज्ञानाने सुसज्जित अध्ययन

छ. मूलभूत शिक्षण व कौशल्य शिक्षण यांच्यामधील सहकार्य वाढवणे

ज. विद्यार्थ्यांचा सर्वांगीण विकास

झ. विद्यार्थीकेंद्रित कार्यक्षम प्रशासन

ञ. महाविद्यालये आणि विद्यापीठे यांची वित्तीय व्यवस्था भक्कम असणे

ट. जागतिकीकरण आणि राष्ट्रीयीकरण

ठ. गुणवत्ता व सामाजिक लेखाजोगा

ड. शिक्षण एक आजीवन अध्ययन प्रक्रिया

१८. उच्च शिक्षणाची रूपरेषा

- माहिती व संसूचना तंत्रज्ञानाशी निगडीत समाजाशी संबंधित असलेल्या उच्च शिक्षणाची संपूर्णतः पुनर्रचना करणे आवश्यक आहे.
- ए-३ ने जोडलेल्या सोसायटीसाठी नवीन शिक्षण
- शिक्षणाचे जागतिक-स्थानिक मॉडेल
- महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण व विकास आयोगाची कार्ये : राज्यासाठी अध्ययन इको-व्यवस्था व ई-व्यासपीठ निर्माण करणे
- नवीन शिक्षण : आजीवन अध्ययन प्रक्रिया म्हणून अध्ययन व विकास यांस जोडणारा दुवा
- उच्च शिक्षण संघटना : विकासात्मक अध्यापन पुनर्रचना
- संलग्न विद्यापीठांची पुनर्रचना
- अध्ययनार्थी व विद्यापीठांची / संलग्न महाविद्यालयांची स्वायत्तता
- विद्यापीठ व्यवस्थापन संस्था
- उच्च शिक्षणाची स्वयंपूर्णता व आधारक्षमता
- काही धोरणात्मक शिफारशी
- नवीन साधने : विद्यापीठ वसाहत व पीपीसी

१९. शिखर समितीच्या शिफारशी

१. सर्वसाधारण शिफारशी

१.१ शैक्षणिक श्रेष्ठत्त्वासाठी स्वायत्तता अधिक बळकट करणे व मान्यवर (पिअर्) निर्धारण कार्यपध्दतीवर लक्ष केंद्रीत करणे.

१.२ संशोधन व सामाजिक विकास कार्यक्रम जोपासणे

१.३ विद्यापीठाच्या बहु-विद्याशाखीय स्वरूपाला संरक्षण देणे व त्याचे संवर्धन करणे.

१.४ अध्ययनकेंद्री दृष्टिकोनाकडे वाटचाल

१.५ उच्च शिक्षण क्षेत्राला "सर्वोच्च प्राथम्य" व फायदे देणे

२. नवीन राज्यस्तरीय उच्च शिक्षणविषयक शासकीय यंत्रणा स्थापन करणे : महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण व विकास आयोग (माहेड)

३. विद्यापीठ स्तरावर शासनाच्या सुधारणा

३.१ विद्याविषयक संशोधन व विकास व नवोपक्रम यांवर लक्ष केंद्रित करणे

३.२ निवडणुका नाहीत

३.३ कार्यचालनाची तत्वे

३.४ मान्यवर अधिष्ठित महाविद्यालयीन व्यवस्था

३.५ निधी पुरवणे

३.६ अधिकार प्रदान केलेले नेतृत्व

३.७ व्यवस्थापन मंडळ

३.८ अधिसभेच्या जागी संस्था मागीदारी परिषदेची पुनःस्थापना करणे

४. परिणामकारक विद्यार्थी शिकाऊ केंद्रगत विद्याविषयक संरचना विकसित करणे.

४.१ आवडीवर आधारित मॉड्यूलर क्रेडिट

४.२ सखोल संशोधन व औद्योगिक एकत्रीकरण

४.३ अभ्यासक्रमाचे तीन घटक

४.४ जिल्हा/ तालुका व्यवस्थापन शिक्षणात सहभागी होण्याची सुविधा

५. उच्च शिक्षणातील माहिती व संसूचना तंत्रज्ञानांच्या पायाभूत सोयींमधील गुंतवणुकीत वाढ

६. उद्योग-विद्यापीठीय जगतामध्ये भागीदारी सुकर करणे व प्रोत्साहन देणे

७. स्वयं- अर्थसहाय्यित आणि आंतरराष्ट्रीय विद्यापीठे : अमर्यादि बदलासाठी एक संधी

शिफारशींवरील शेवटची टिप्पणी

२०. जोडपत्र : महाराष्ट्र शासनाची शिखर समितीची स्थापना करण्याबाबतच्या शासन निर्णयाची प्रत.

**१.०प्रस्तावना**

महाराष्ट्र शासनाने दि.२३ ऑगस्ट, २०१० रोजीच्या शासन निर्णयाद्वारे, महाराष्ट्रातील उच्च शिक्षणाचा दर्जा व गुणवत्ता यांमध्ये वाढ करण्याच्या हेतूने, त्याबाबत शिफारशी करण्यासाठी एक उच्चस्तरीय समिती घटित केली होती. याचवेळी शासनाने इतर दोन समित्याही घटित केल्या होत्या. पहिली, विद्यापीठ अधिनियमात कालानुरूप सुधारणा करण्यासाठी आणि दुसरी विद्यापीठे व त्यांच्याशी संलग्न महाविद्यालये यांच्याशी संबंधित बाबींचे प्रशासन यावर लक्ष ठेवण्यासाठी. यामध्ये नवीन आव्हाने विचारात घेऊन, उच्च शिक्षणाच्या बदलत्या स्वरूपातील रूपांतरण सुरळीतपणे होण्यासाठी व कार्यान्वयनात अधिक तत्परता आणण्यासाठी विद्यापीठे वेगळी करणे आणि / किंवा त्यांचे दोन भाग करणे, तसेच जीईआर यामध्ये वाढ करणे याचा समावेश होतो. या समितीच्या संबंधातील शासन निर्णयाची एक प्रत परिशिष्टामध्ये पाहता येऊ शकेल.

या तिन्ही समित्यांच्या विचारार्थ विषयांमध्ये, उच्च शिक्षणाची ढासळत जाणारी गुणवत्ता आणि जागतिकीकरणाने समोर ठेवलेली आव्हाने यांच्या बाबत शासनाला वाटणारी काळजी जसे जीईआर मध्ये वाढ करण्याची तीव्र निकड, समाजातील दुर्बल घटकांच्या विद्यार्थ्यांना उच्च शिक्षण सहजरीत्या उपलब्ध करून देण्याची गरज, संशोधनाच्या स्तरामध्ये वाढ करण्याचे महत्त्व, विकासासाठी ज्ञानाचे उपयोजन, उच्च शिक्षणामध्ये नवीन उपक्रम राबविणे आणि उपक्रमशीलतेमध्ये वाढ करणे, रोजगारक्षमतेत वाढ करण्याची गरज आणि असे इतर घटक यांचे स्पष्टपणे प्रतिबिंब पडलेले दिसते.

**राज्य सहाय्यित १३ विद्यापीठांना जवळजवळ ४००० इतकी महाविद्यालये संलग्न केलेली आहेत, त्यापैकी साधारणतः निम्मी संलग्नित महाविद्यालये पुणे, मुंबई व नागपूर विद्यापीठाशी संलग्न आहेत, त्या प्रत्येक**

सध्या महाराष्ट्रात उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या अंतर्गत १९ राज्य अनुदानित विद्यापीठे आहेत. या विद्यापीठांमध्ये प्रत्येकी एक आरोग्य विज्ञान विद्यापीठ आणि एक पशु व मत्स्यव्यवसाय विज्ञान विद्यापीठ, चार कृषि

विद्यापीठे व तेरा व्यापक पायावर आधारित विद्यापीठे आहेत. वर नमूद केलेल्या समितीची व्याप्ती ही या तेरा विद्यापीठांपुरतीच मर्यादित आहे. या १३ विद्यापीठांस जवळजवळ ४००० इतकी संलग्नित महाविद्यालये आहेत. त्यांपैकी जवळजवळ निम्मी महाविद्यालये ही पुणे , मुंबई आणि नागपूर विद्यापीठांशी संलग्न आहेत. त्या प्रत्येक विद्यापीठांमध्ये सुमारे ५५० ते ७०० इतकी महाविद्यालये आहेत या मोठ्या विद्यापीठांत प्रत्येकी जवळपास ५ लाख इतके विद्यार्थी आहेत. अशा प्रकारच्या मोठ्या यंत्रणेचे व्यवस्थापन करणे हा या विद्यापीठांवर मोठा भारच होतो आणि गुणवत्तापूर्ण शिक्षण व संशोधन यांची तरतूद करणे ही याच्याशी संबंधित त्यांची जी मुख्य भूमिका आहे त्यापासून ती विद्यापीठे दूर जातात.

**विद्यापीठांमध्ये सुमारे ५५० ते ७०० इतकी महाविद्यालये आहेत. या मोठ्या विद्यापीठांत प्रत्येकी अदमासे ५ लाख इतके विद्यार्थी आहेत.**

या तिन्ही समित्या आपापले विचार व कल्पना यांची देवाणघेवाण करून एकत्र काम करतात. ह्या समितीने, ती शिखर समिती असल्यामुळे, तिच्या मॅन्डेटशी सुसंगत असणाऱ्या व्यापक धोरणांपर्यंतच स्वतःला निर्बंधित ठेवले आहे. इतर दोन समित्यांच्या अहवालांमध्ये विशिष्ट तपशीलाचा समावेश केला आहे.

### २.० पार्श्वभूमीः महाराष्ट्राच्या उच्च शिक्षणाच्या सुधारणांचे संकेत

शिक्षण ही, व्यक्तिगत तसेच समाजाच्या स्तरावर जीवनाची गुणवत्ता उंचावणे शक्य करणारी एक किल्ली आहे. उत्तम गुणवत्तापूर्ण शिक्षण हे व्यक्तीला व समाजाला गतिमान मानवी विकासाच्या प्रक्रियेत शक्ती मिळवून देते. ते व्यक्तीची त्याच्या स्वतःच्या उपजीविकेच्या मिळकतीची क्षमता वाढवते, तसेच राष्ट्रीय अर्थव्यवस्थेच्या विकासात भर घालते. सध्या आपण एका गतिमान आर्थिक प्रगतीच्या युगात आहोत. त्यात "ज्ञान" हे प्रगतीच्या प्रवासाचे महत्त्वाचे साधन आहे. आपल्या प्रचंड मोठया संख्येने असलेल्या युवकांसाठी ही लक्षणीय संधी असतानाच, आपल्या सध्याच्या व नव्याने उद्‌भवणाऱ्या गरजा भागविण्यासाठी उच्च शिक्षणाच्या प्रश्नांवर तातडीने विचार करण्याची गरज आहे. सामान्यतः, आपल्या परंपरा व काळाच्या कसोटीवर उतरलेल्या मूल्य व्यवस्था आणि

समाजाच्या गरजा, उद्योग व राष्ट्रीय विकासाची प्रक्रिया यांसह शिक्षण प्रक्रियेमधील ज्ञान, कौशल्य व मानवविज्ञान अशांची आखणी, याच्या पार्श्वभूमीवर होत असणाऱ्या सामाजिक बदलांचे कल्पनाचित्र रेखाटून तयार होणारे प्रश्न, यांचाही यात समावेश आहे. विद्यार्थ्यांना सध्याच्या व नव्याने निर्माण होणाऱ्या समस्यांवर उपाय शोधून काढण्याची शक्ती मिळवून देईल अशी नवीन उपक्रमांच्या व उपक्रमशीलतेच्या चैतन्याचे पोषण करील अशी आपली शिक्षण व्यवस्था निर्माण करण्याची व समाजामध्ये मोठ्या प्रमाणावर बदल घडवून आणण्यासाठी त्याची प्रभावीपणे अंमलबजावणी करण्याचीही गरज आहे.

महाराष्ट्राला सामाजिक सुधारणांच्या चळवळीची व लोकांना व्यापक प्रमाणात शिक्षण देऊन त्याद्वारे त्यांचे सक्षमीकरण करण्याची अशी एक परंपरा आहे. अशी अनेक उदाहरणे पहायला मिळतात की, बऱ्याचदा नवीन कल्पना महाराष्ट्रात सर्वप्रथम उदयाला आल्या व नंतर त्या देशभरात सर्वत्र अंगीकारण्यात आल्या.

**महाराष्ट्राला सामाजिक सुधारणांच्या चळवळींची व लोकांना व्यापक प्रमाणत शिक्षण देऊन त्याद्वारे त्यांचे सक्षमीकरण करण्याची अशी एक परंपरा आहे.**

आपल्याला, नव्याने उदयास येण्याऱ्या तंत्रज्ञानाच्या परिणामी, आपल्या समाजात जे वेगाने असे बदल होतात, त्या बदलांची माहिती करून घेण्याची गरज आहे. यामुळे नीतिशास्त्र व तडजोड यांचा गंभीर प्रश्न निर्माण होतो. आज तथाकथित ए ३ मुळे (कोणीही, कुठेही व कधीही) जोडला गेलेला समाज एका बाजूला तर तर दुसऱ्या बाजूला, अंकशास्त्रीय-दृष्ट्या अडाणी, अशिक्षित समाज आहे. या दोन्हींमुळे मोठी सामाजिक आर्थिक आव्हाने निर्माण होतात, ती मोठ्या प्रमाणावर तातडीने यथोचित शिक्षण देण्याद्वारे सोडवता येऊ शकतात.

बेरोजगारीच्या प्रश्नाच्या संदर्भात, शिक्षण व्यवस्थेने रोजगार करू इच्छिणारे निर्माण करण्यापेक्षा रोजगाराची निर्मिती करणारे घडवण्यावर जास्त भर दिला पाहिजे, परिणामी समाजात खूप मोठी समानता येईल. साक्षेपी ज्ञानाचा व्यासंग वाढवणे व त्यांच्या कक्षा रुंदावणे तसेच नवीन उपक्रमाच्या आणि तंत्रज्ञानाच्या विकासाच्या चैतन्याचे संवर्धन करणे हे सुलभ करणारी उच्च

शिक्षणाची चौकट ही त्याच वेळी रोजगार निर्मितीच्या गरजांना ते सहाय्यभूत होणारी असावी. स्थानिकरीत्या योग्य उपाय शोधण्याच्या उद्देशाने पाठपुरावा केलेले उच्च शिक्षणाचे कार्यक्रम हे, मानवी भांडवलाला चालना देऊन विकास व वृद्धी यात गतिमानता आणणे आणि यंत्रणेच्या पायातील बेड्या होऊ न देणे गरजेचे आहे. आर्थिक वाढ आणि जगाबरोबर वाढत जाणारे परस्पर संबंध या पार्श्वभूमीवर आपल्या तरुणांची तीव्र गतीने वाढणारी महत्त्वाकांक्षा विचारात घेता, आपल्या उच्च शिक्षण व्यवस्थेस, आपल्या तरुणांकरता व्यापक अवकाश, सशक्तीकरण, नव्या स्थित्यंतराचे प्रतिनिधी म्हणून त्यांना घडवणे तसेच त्यांना उपजीविकेची हमी ज्याद्वारे देणे शक्य होईल अशा तातडीच्या व आमूलाग्र रूपांतरणाची गरज आहे.

औद्योगिकदृष्ट्या जास्त प्रगत असलेल्या देशांतील लोकसंख्या वृद्ध होत चालली आहे ही गोष्ट विचारात घेता, आपल्या तरुणांना फक्त भारतातच नाही तर जगातील इतर बाहेरच्या देशातही संधी आहेत. चाणाक्ष दृष्टीने, उच्च शिक्षणात जेव्हा गुंतवणूक करण्यात येईल तेव्हा, आपल्या लोकसंख्याशास्त्रीय फायद्यांपैकी सगळ्यात भरीव फायदा केवळ संबंधित व्यक्तीलाच नव्हे तर त्याचबरोबर व्यापक अर्थाने राष्ट्रालाही मिळू शकेल.

युनायटेड स्टेट्स ऑफ अमेरिका, चीन आणि जपान यांच्या खालोखाल, आता भारत हा, क्रयशक्ती तुल्यतेच्या परिभाषेत जगातील सर्वात मोठी अर्थव्यवस्था असणारा चौथ्या क्रमांकाचा देश बनला आहे. ८.५ टक्के अशा वार्षिक आर्थिक वाढीच्या दरासह, भारत लवकरच जपानला मागे टाकेल आणि त्यानंतर फक्त युनायटेड स्टेट्स ऑफ अमेरिका, चीन व भारत अशी तीनच प्रमुख मित्रराष्ट्रे जगाची अर्थव्यवस्था निश्चित करतील. त्यापुढे जाऊन भारताने आपल्या तरुण लोकसंख्येच्या बळावर, जी काही काळाकरिता जगातील मोठी उत्पादकता असलेली लोकसंख्या म्हणून राहील, त्या आधारावर भारताला यापूर्वी कधीही मिळाली नव्हती अशी जगाचे नेतृत्व करण्याची संधी मिळेल आणि तो जगातील मोठा समृध्द देश म्हणून आपले वैभव परत मिळवील. जे वैभव भारताने कित्येक अतिक्रमणे झाली असतानाही ११ व्या शतकापासून १७ व्या शतकापर्यंत उपभोगले.

जगातील सर्वात जास्त तरुणांची लोकसंख्या, तसेच जगातील सर्वात जास्त वैज्ञानिक व तंत्रशास्त्रीय मनुष्यबळ, संपूर्ण जगभर पसरलेले आणि जागतिक स्तरावर स्वीकार्यता व आदर मिळवलेले मोठ्या संख्येने असलेले अनिवासी भारतीय, अणुऊर्जा, अवकाश, संरक्षण, तंत्रज्ञान व नव्याने उदयास येणारी क्षेत्रे यांचा समावेश असलेले विज्ञान व तंत्रज्ञान आणि विशेषेकरून माहिती व संसूचना तंत्रज्ञानामधील भारताची लक्षणीय निष्णातता या सर्व गोष्टी भारत हा पुन्हा एकदा जगातील महान राष्ट्रांपैकी एक होणार असल्याचे दर्शवितात.

**आपल्या तरुण लोकसंख्येच्या बळावर, जी काही काळाकरिता जगातील मोठी उत्पादकता असलेली लोकसंख्या म्हणून राहील, त्या आधारावर भारताला यापूर्वी कधीही मिळाली नव्हती अशी जगाचे नेतृत्व करण्याची संधी मिळेल आणि तो, जगातील मोठा समृध्द देश म्हणून आपले वैभव परत मिळवील. जे वैभव भारताने कित्येक अतिक्रमणे झाली असतानाही ११ व्या शतकापासून ते १७ व्या शतकापर्यंत उपभोगले.**

२१ वे शतक निश्चितच भारतासाठी एक सुवर्णसंधी घेऊन येत असतानाच, भारतातील बहुसंख्य जनतेला (१२० कोटी जनतेपैकी ८० कोटी जनता) त्यांच्या रोजच्या आयुष्यात अनेक ज्वलंत प्रश्नांनी घेरले आहे. जागतिकीकरणाच्या तीव्र वेगात गेल्या दोन दशकात या प्रश्नांचा अधिकच प्रसार झाला आणि त्यांची तीव्रता खूपच वाढली. या प्रश्नांची गुंतागुंत इतकी जास्त आहे की, पारंपरिक साधने व पध्दतींचा अवलंब करून नजीकच्या काळात या गंभीर प्रश्नांमधून बाहेर येणे शक्य आहे यावर विश्वास ठेवावयाला खूपच कमी वाव आहे.

पुन्हा एकदा प्रतिपादन करतो की, भारताच्या सामाजिक-आर्थिक स्थित्यंतरणामध्ये महत्त्वाची भूमिका पार पाडण्याची महाराष्ट्राची परंपरा आहे. महाराष्ट्र जे काही करतो त्याचे अनुकरण इतर राज्ये काही स्वरूपात किंवा अन्यप्रकारे करतात. सर्व स्तरावर शिक्षण हीच सामाजिक-आर्थिक स्थित्यंतरणाची गुरूकिल्ली आहे आणि या संदर्भात, जगाचे प्रतिनिधित्व

करणारा देश म्हणून सक्षम व अग्रगण्य असलेल्या भारताचा अनुभव पाहता, आपण महाराष्ट्राच्या शैक्षणिक यंत्रणेतील सुधारणांकडे, विशेषेकरून उच्च शिक्षणाकडे लक्ष दिलेच पाहिजे.

### ३.० जागतिक उच्च शिक्षणः संदर्भ, अध्ययन व आव्हाने

जागतिक उच्च शिक्षणाचे चित्र हे दर्जा, समाज, व्यापार व समाजांतर्गत तसेच जगाच्या बौध्दिक मुशीत शिरकाव करून, त्यातून बाहेर पाडण्याचे कौशल्य,असे मोहक आहे.

अमेरिकेकडे उच्च शिक्षणाची सर्वात विकसित अशी यंत्रणा आहे हे वादातीत आहे, आणि जागतिक युद्धपूर्व व युद्धानंतरच्या काळातही असलेल्या यंत्रणांमधून आजच्या वेगवेगळ्या यंत्रणा विकसित झाल्या आहेत. विज्ञान व तंत्रज्ञान अवकाशात त्याच्या असणाऱ्या नेतृत्वाचा, त्याच्या संपन्न व विविध अशा उच्च शिक्षणाच्या आदर्शांशी थेट सहसंबंध आहे. दुसऱ्या बाजूला युरोप हे राज्य गुंतवणूक आदि उच्च शिक्षणात त्याच्या नागरिकांना देत असणाऱ्या मुक्त प्रवेशाचे प्रात्यक्षिकच आहे. ऑस्ट्रेलिया आणि न्यूझीलंड यांनी मोठ्या प्रमाणावर अमेरिकेचे आदर्श उसने घेतलेले आहेत आणि आता ते पारंपरिक, चिनी आणि भारतीय ग्राहकांना उच्च शिक्षणाच्या आशियाई सेवा म्हणून उच्च शिक्षण देण्यासाठी मार्ग दाखवतात. चीन, कोरिया, जपान व अतिपूर्वेकडील देश हे मोठ्या प्रमाणावर असे आदर्श अनुसरत आहेत. त्यात चीनकरिता सरकारी गुंतवणूक, कोरियाकरिता खाजगी गुंतवणूक, जपान व अतिपूर्वेकडील देशांकरिता संमिश्र गुंतवणूक यांचा समावेश आहे. अशाप्रकारे असे दिसून येते की, निश्चित असे आदर्श कोणतेच नाहीत, पण वस्तुस्थिती अशी आहे की, सगळीच राष्ट्रे उच्च शिक्षणात सरकारी गुंतवणूक करत आहेत.

राज्यांच्या या सहभागाचा अर्थ असा होतो की, कल्याणकारी राज्यांना आता केवळ खर्च व त्यांच्या अर्थव्यवस्थेवर येणारा ताण यासाठी जीईआरच्या वाढत्या समस्यांना सामोरे जावे लागत आहे. खाजगी तरतुदीच्या

**जागतिक उद्योग संघटनांचे महादेश सर्वांना समानतेने लागू करताना, जग हे फक्त एक जागतिक खेडेगाव म्हणून नव्हे तर, एका जागतिक खेडे गावाची वर्गखोली (क्लासरुम) म्हणून समोर ठेवण्यात आले आहे.**

बाबतीत, उच्च जीईआर पुन्हा गुणवत्ता देण्याच्या हेतूने, अतिरिक्त विनियमन करण्याकरिता गरज निर्माण करत आहे. जे विद्यार्थी ऑस्ट्रेलियासारख्या देशातील सुसज्ज, आधुनिक असे उच्च शिक्षण घेऊ इच्छितात, त्यांना खर्च व गुणवत्ता या दोन्ही सेवांसाठी स्पर्धात्मक आव्हानांना सामोरे जावे जागते.

जागतिक उद्योग संघटनांचे महादेश सर्वांना समानतेने लागू करताना, जग हे फक्त एक जागतिक खेडेगाव म्हणून नव्हे तर, एका जागतिक खेडेगावाची वर्गखोली (क्लासरुम) म्हणून समोर ठेवण्यात आले आहे. ज्या पद्धतीने जग एकमेकांशी संपर्क साधत आहे ती पद्धत बदलणाऱ्या तंत्रज्ञानांच्या सर्वव्यापकतेसह, अशी अपेक्षा करण्यात येत आहे की, जग ज्या पद्धतीने शिकत आहे किंवा शिकवत आहे ती पद्धत देखील जग बदलेले, बौद्धिक नेतृत्व हे फक्त संपर्कांच्या माध्यमापुरतेच आणि दगडविटांनी बंदिस्त केलेल्या संस्थांच्या पारंपरिक ज्ञानाच्या भांडारा पुरतेच मर्यादित राहणार नाही. अशा वेळी राष्ट्र, संस्था आणि व्यक्ती यांना तारण्यासाठी, नवनवीन कल्पना पुढे येतील. अशाप्रकारे, उच्च शिक्षणाची तीव्र गरज भासेल व विकसित व विकसनशील अशा दोन्ही प्रकारच्या राष्ट्रांमध्ये त्याची मागणी वाढण्याची अपेक्षा आहे.

बौद्धिक संपत्ती हे राष्ट्रांना सामोरे जावे लागणारे दुसरे आव्हान आहे आणि तंत्रज्ञान, शिक्षण, स्पर्धा व सामाजिक विकास यांमधील नातेसंबंध व खुद्द उच्च शिक्षण हे समाजासाठी आणि समाजाबरोबर कसे काम करते तेच उघड करतील.

हे जगासमोरील आव्हान आहे. आपल्याकडे असलेल्या लोकशाहीचा फायदा घेताना भारतासाठी ते जसे एक आव्हान आहे तशीच एक संधीसुध्दा आहे.

**४.० .भविष्यवेध आणि भारतापुढील आव्हान.**

भारतासमोर असणारे उच्च शिक्षणाचे आव्हान हे खात्रीने दुपदरी आहे. त्यापैकी एक म्हणजे उच्च शिक्षणाच्या क्षेत्रात प्रवेश मिळविणे व समावेश करून घेणे व दुसरे म्हणजे गुणवत्ता व श्रेष्ठत्वाच्या परिभाषेत बोलायचे तर, कौशल्य व संपर्कांचे संवर्धन करणे. आपल्या दूरदृष्टीने उच्च

शिक्षणाच्या सर्व स्तरावर आपल्या कौशल्यबुध्दीचा पूर्णपणे व आपल्या तरुणांची महत्वाकांक्षा या मानवी भांडवलाचा  जास्तीत जास्त समावेश करून घेतला पाहिजे. परंपरेने, भारताकडे त्याचे संशोधन व शिष्यवृत्ती यांच्यामार्फत ज्ञानाच्या चळवळीत आघाडीवर राहण्याची क्षमता आहे. सध्याच्या ज्ञानाधारित अर्थव्यवस्थेच्या युगात, आपल्या मोठ्या संख्येने असलेल्या व बुद्धिवान अशा तरुणांना, आपला जागतिक प्रभाव वाढविण्यासाठी प्रगत ज्ञानशाखांमार्फत शिक्षण देण्याची गरज आहे. भारत वेगाने आर्थिक वाढीच्या वाटेवर वाटचाल करत असताना आणि जगातील काही मोजक्याच अशा अग्रगण्य देशांमध्ये आपले स्थान प्राप्त करीत असताना, आपल्याला नवनवीन उपक्रम, सामर्थ्य व कौशल्ये यांना आणखी धार लावण्याची गरज आहे. नवीन ज्ञानाचे नवीन तंत्रज्ञानात रूपांतर करण्याचे आपले सामर्थ्य बळकट करण्याची व ते इतर देशांपुढे आणण्याची गरज आहे.

या प्रयोजनार्थ, आपल्याला सर्वसमावेशक नवोपक्रम व उद्योजकता असलेली इको-व्यवस्था निर्माण करण्याची गरज आहे. ज्यात संशोधन तसेच तंत्रज्ञान, विकास व वाणिज्यीकरण यांच्याबरोबरच उच्च गुणवत्ता असलेल्या उच्च शिक्षणाचा अंतर्भाव असेल. नवनवीन उपक्रम व तंत्रशास्त्रीय सामर्थ्य ही आपली जागतिक स्तरावरील यशस्वी गुंतवणुकीची किल्ली असतानाच, आपल्याला आपल्या देशातील आव्हाने, म्हणजे ग्रामीण व कृषि अर्थव्यवस्थेचा वेग वाढवणे, सामाजिक सबलीकरण व आर्थिक तसेच अंकशास्त्रीय तफावत (digital divide) भरून काढणे, इत्यादिंना सामोरे जाण्यासाठी नवीन उपाय शोधून काढण्याचीही गरज आहे.

आपल्या विद्यापीठांना उपाय शोधून काढण्यासाठी प्रयत्न करण्याची तसेच, त्यांची समाजात अंमलबजावणी करण्यासाठी, आपल्या तरुणांना प्रशिक्षण देण्याची गरज आहे. तसेच, आपली उच्च शिक्षण यंत्रणा ही ज्ञान व कौशल्याच्या आधाराच्या परिभाषेत, आपल्या तरुणांना पुरेसे सक्षम करणारी असावी, जेणेकरून, त्यांचा रोजगार ही एक समस्या बनणार नाही, तर यात यापूर्वी नमूद केल्याप्रमाणे रोजगार मिळवू पाहणारे बनवण्यापेक्षा रोजगार निर्माण करणारे म्हणून घडविण्याकडे ती अधिक पसंती दर्शवील. सामर्थ्य, बुद्धी व महत्त्वाकांक्षा यांच्या जोरावर त्यांना जास्तीत जास्त

आनंद व सामाजिक सुस्थिती मिळविणे शक्य व्हावे, अशी दूरदृष्टी आपल्या उच्च शिक्षण व्यवस्थेत असायला हवी. जी भारतीयही असेल तसेच जागतिकही असेल, अशी एक इको व्यवस्था तयार करणे किमान इतकीच आपण अपेक्षा करू शकतो. जगातील उच्च शिक्षणातील मूल्य प्राप्त करण्यावर व ते वाटून घेण्यावर लक्ष केंद्रित करत असतानाच शिक्षण हे भारतीय नागरिकांच्या गरजांभिमुख आहे याची आपण खात्री करणे गरजेचे आहे. आपल्याला एक नवीन नियामक चौकट तयार करण्याची गरज आहे, जी उच्च शिक्षण क्षेत्राला परिपोषित करेल व तिचे नियमन करेल, जेणेकरून ते (उच्च शिक्षण क्षेत्र) बुद्धिमत्ता, ज्ञान व सामाजिक-आर्थिक स्थित्यंतरण करणाऱ्या विकासात्मक उपाययोजनांना लागणारे कौशल्य यांमध्ये अग्रणी होऊ शकेल. अशा यंत्रणेकरिता समव्यावसायिकांची विश्वसनीय अशी देखरेख करणारी एक स्वायत्त शासन व्यवस्था असण्याची गरज आहे. ज्ञानाच्या परिसीमांच्या अभिवृद्धीसाठीचे योगदान, मूल्यावर्धित तंत्रज्ञान, भविष्याच्या दृष्टिकोनातून आपल्याला घडविणारी धोरणे, विविध विनिर्दिष्ट स्तरांवरील मानवी साधनसंपत्ती आणि त्यांची रोजगारक्षमता, इत्यादी सारख्या उच्च पातळीवरील परिणामांकरिता शासन व समाज यांच्याप्रति जबाबदारी असली पाहिजे. यंत्रणेचे उर्वरित व्यवस्थापन हे, स्वायत्त असावे आणि समव्यावसायिक गटानी श्रेष्ठत्वाचे निकष निर्धारित करावेत. अशा या व्यवस्थेमध्ये मोठ्या प्रमाणात बुद्धी व विशेष ज्ञान, यांना धरून ठेवण्याची क्षमता असावी, खरे म्हणजे बाहेरील बुद्धिमंतांना आकर्षून घ्यावे. आर्थिकदृष्टया, अशा या व्यवस्थेला भरपूर प्रमाणात निधी दिलेला असावा आणि

**भारत, वेगाने आर्थिक वाढीच्या वाटेवर वाटचाल करत असताना आणि जगातील काही मोजक्याच अशा अग्रगण्य देशांमध्ये आपले स्थान प्राप्त करीत असताना, आपल्याला नवनवीन उपक्रम, सामर्थ्य व कौशल्ये यांना आणखी धार लावण्याची गरज आहे. नवीन ज्ञानाचे नवीन तंत्रज्ञानात रूपांतर करण्याचे आपले सामर्थ्य बळकट करण्याची व ते इतर देशांपुढे आणण्याची गरज आहे.**

अधिक योग्य रीतीने आशादायक नवीन कल्पना शोधून काढणे शक्य व्हावे यासाठी उदारपणे निधी दिलेला असावा.

**५.० भारतामधील उच्च शिक्षणाचे चित्र**

**मॅट्रिक्सचे नियमन**

मानवी साधनसंपत्ती विकास मंत्रालय हे, उच्च शिक्षणाकरिता धोरण व निदेशन यांच्याशी संबंधित बाबीसंबंधात, केंद्रामध्ये मुख्य आहे. राज्याला या संदर्भातील त्यांचे स्वतःचे उपक्रम व प्रकल्प तयार करणे, त्यांचे व्यवस्थापन व अंमलबजावणी करणे याकरिता, या धोरणाअन्वये व मार्गदर्शकतत्त्वांन्वये अधिकार प्रदान केले जातात. विद्यापीठ अनुदान आयोग व विविध व्यावसायिक परिषदा, जसे अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद, भारतीय वैद्यक परिषद, वास्तुशास्त्र परिषद, इत्यादी कित्येक वर्षांपासून उच्च शिक्षणाचे कार्यक्रम व पायाभूत सोयीसुविधा यांची तरतूद व विकास यावर नियंत्रण ठेवतात. राज्य शासनाला, त्याच्या राज्य स्तरीय अधिकारक्षेत्रांमध्ये उच्च शिक्षणाच्या पायाभूत सुविधांचा प्रसार करण्यासाठी विविध प्राधिकरणे, संस्था व मंडळे यांचे काम विधिबद्ध केले आहे आणि योजना तयार केल्या आहेत. उच्च शिक्षणावरील केंद्रीय योजनांचाही, जसे आयआयटी, आयआयएम, एनआयटी आणि थेट निधी देण्यात येणाऱ्या उच्च शिक्षण संस्थांचा मोठा समूह यांचाही समावेश राष्ट्रीय योजना म्हणून करण्यात आला आहे. सांगण्याचा सारांश असा की, आपल्याकडे भारतामधील उच्च शिक्षण संस्था चालविणारे केंद्र, राज्य व स्थानिक खाजगी संस्था अशी त्रि-स्तरीय संरचना आहे.

विद्यापीठ अनुदान आयोग हा, निधी देणारी संस्था असून तिने तिच्या कार्यालयामार्फत नानाविध व आव्हानात्मक बहुराज्यीय व बहुविध प्राथम्य असलेले संस्था निर्मितीचे, व्यवस्थापनाचे व गुणवत्ता नियंत्रणाचे काम पार पाडले आहे.

व्यावसायिक व तंत्र क्षेत्रामधील परिषदा या उद्योगाशी जोडणाऱ्या आणि गुणवत्ता आणि विविध अभिस्वीकृत व्यवसायांच्या गरजा यांच्या सरंक्षकाचे काम करतात. या परिषदा विनिर्दिष्ट

तंत्र व्यावसायिक कार्यक्रम पार पाडणे व देशभरात खाजगी संस्थांमार्फत  शिक्षण देण्यास मदत करणे या बाबतही महत्त्वाची भूमिका निभावतात.

विस्तारीकरण, विकास, गुणवत्ता व केवळ विषयांचे नेतृत्व यांची आव्हाने संपूर्ण देशभर पसरली आहेत. तसेच उच्च शिक्षणाच्या महत्त्वाकांक्षा व अपेक्षा खूपच जास्त आहेत. यामुळे  नियामक व प्रशासकीय चित्र असे आहे की, त्यात विधिविधानाचे व्यवस्थापन एक पद्धती बनली आहे आणि काही प्रकरणात, गंभीर वादविवादही होतात.

**भारताची दारिद्र्यामधून बाहेर पडण्याची महत्त्वाकांक्षा आणि संधीच्या आकर्षणामुळे आपल्या मोठया संख्येतील तरुण लोकसंख्येला उच्च शिक्षणाच्या कार्यक्षेत्रात अधिकाधिक आणले जात आहे. यात अंतर्भूत असलेल्या केवळ मोठया संख्येमुळे त्याकरिता केलेली तरतूद खेदजनकरीत्या अपुरी पडत आहे.**

महाराष्ट्र मानवी साधनसंपत्ती विकास विभाग, भारत सरकार यांनी २०१० मध्ये प्रसिद्ध केलेल्या, २००७ च्या आकडेवारीनुसार, भारतात विद्यापीठ स्तरावरील ४०६ संस्था आहेत, त्यात २३०९९ महाविद्यालये आहेत. सर्व उच्च शिक्षणाच्या अभ्यासक्रमातील विद्यार्थ्यांची एकूण पटसंख्या जवळपास १.७० कोटी इतकी अंदाजित केली आहे. यामुळे राष्ट्राचा एकूणच जीईआर हा १३.७९ इतका झाला आहे.

**उलगडत जाणारे भविष्य**

भारताची दारिद्र्यामधून बाहेर येण्याची महत्त्वाकांक्षा आणि संधीच्या आकर्षणामुळे, आपल्या मोठया संख्येतील तरुण लोकसंख्येला उच्च शिक्षण कार्यक्षेत्रात, अधिकाधिक आणले जात आहे. यात अंतर्भूत असलेल्या केवळ मोठया संख्येमुळे त्याकरिता केलेली तरतूद खेदजनकरीत्या कमी पडते आहे.

गुणवत्ता आणि संख्या या दोन्हीची गरज आहे, आणि अशाप्रकारे भारताकरिता ते एक चिरकालिन आव्हान आहे. आपल्याला, वेगाने होणाऱ्या विस्ताराची तसेच दर्जात्मक वाढीच्या गरजा पूर्ण करण्यासाठी नवीन कार्यचौकट तयार करण्याची गरज आहे. गुंतवणूक, दर्जा आणि

सामाजिक उत्पन्नाबरोबरच गुंतवणुकीची परतफेड म्हणून सामाजिक क्षेत्रात त्यांना प्रोत्साहन मिळेल असे एक पारदर्शी विनियामक परिस्थितीचे कार्यान्वयन करण्यासाठी, खाजगी, विदेशी आणि शासन सहाय्यित पुरवठादारांचा समावेश करण्यासाठी या क्षेत्राची पुनर्रचना करण्याचा कोणीही विचार करू शकेल. निवडीची उदाहरणे, स्पर्धा आणि बाजारातील मागणी प्रदत्त मूल्य हे भारतातील बहुतेक नागरिकांना विमानचालन, वित्तीय सेवा व दूरसंचार या क्षेत्रातील खुल्या विनियामक संरचनांमार्फत, विधिग्राह्य झाले असल्याचे दिसते. त्यापैकी एक घेतले तरी त्या आधारे, उच्च शिक्षणाने, त्वरेने विकासाच्या क्षेत्रात फायदा घेऊन, तसे शिक्षण देऊन, या लाटेवर स्वार होऊन पुढे जाण्याची गरज आहे. हे काम एका रात्रीत घडून येऊ शकत नाही, हे आपण ओळखले पाहिजे त्याचबरोबर आपण अशी एक कार्यचौकट तयार करण्याची गरज आहे, जी अशा स्थित्यंतरात आपल्याला प्रवेश मिळवून देणे सुकर करील. हे स्पष्ट आहे की, शासनाने उच्च शिक्षणाला ते करत असलेल्या सहाय्यामध्ये वाढ करून या प्रयोजनासाठी कृतीशील पावले उचलण्याची गरज आहे.

**खाजगी क्षेत्राच्या सहभागाचा इतिहास**

केंद्र व राज्य स्तरांवरील शासनांनी, भारतातील उच्च शिक्षणामध्ये पारंपरिक पद्धतीने निधी दिला आहे. अनुदानित संस्था विशेषतः शाळा व महाविद्यालये सुरू करून आणि त्यानंतर साठ व सत्तरच्या दशकापासून विनाअनुदानित संस्था सुरू करून, खाजगी विश्वस्त मंडळे व संस्था या शासनाच्या बरोबरीने कार्य करीत आहेत. शिक्षणाच्या क्षेत्रात अचानकपणे सहभागी होणाऱ्यांचे प्रमाण गेल्या

दशकामध्ये किंवा त्यानंतर सर्वाधिक राहिले आहे. हा सहभाग, व्यावसायिक व तंत्र शिक्षणामध्ये आणि अर्थातच वैद्यकीय शिक्षणामध्ये असल्याचे स्पष्टपणे दिसून येते. काही राज्यांमध्ये खाजगी क्षेत्रांचा सहभाग लक्षणीयरीत्या दिसून येत असताना इतर काही राज्ये सहभाग वाढविण्यासाठी मुळीच सक्षम नाहीत.

**आपल्याला वेगाने होणाऱ्या विस्ताराची तसेच दर्जात्मक वाढीच्या गरजा पूर्ण करण्यासाठी नवीन कार्यचौकट तयार करण्याची गरज आहे.**

या राज्यांत, सहभाग मिळविण्यातील समतोल साधण्यामध्ये शासनाची भूमिका निर्णायक आहे. जास्त मागणी असलेल्या क्षेत्रांमध्ये, ज्ञानशाखा किंवा केवळ भौगोलिकस्थान यांद्वारे खाजगी क्षेत्र नेहमीच अग्रेसर राहिले आहे. याचा परिणाम, तामिळनाडू, कर्नाटक, आंध्र प्रदेश व महाराष्ट्र तसेच उत्तरेकडील काही राज्ये यांसारख्या राज्यांमध्ये खाजगी क्षेत्रास वाव देणारी व शिक्षण देणारी क्षेत्रे (Pockets) निर्माण होण्यात झाला आहे.

**प्रस्तावित परदेशी शिक्षण पुरवठाकारांचा प्रवेश**

भारताची सर्वाधिक मागणी व तरुणांमधील सर्वाधिक संभाव्य बौद्धिक क्षमता यांमुळे परदेशी शिक्षण पुरवठाकारांना भारताबरोबर काम करण्यामध्ये अत्यंत उत्सुकता असल्याचे दिसून येते.

अमेरिका, इंग्लंड व ऑस्ट्रेलिया यांसारख्या काही अर्थव्यवस्थांना, पूर्णतः फी देणाऱ्या भारतातील आंतरराष्ट्रीय विद्यार्थ्यांमध्ये लक्षणीय फायदा दिसून आला असून, यामुळे त्यांच्या स्वतःच्या नागरिकांना उच्च शिक्षण देण्याचा खर्च कमी होण्यास काही प्रमाणात मदत झाली आहे.

शिक्षण सेवांची निर्यात व विशेष बुद्धिमत्तेची आयात या मूळ बाबींशिवाय, या देशांना, सेवांची देवघेव करण्याचा पुढचा टप्पा असलेल्या शिक्षण क्षमतेचे मूल्य कळून चुकले आहे.

आपल्याला लाभ करून घेता येतील व नकारात्मक आघात टाळता किंवा कमी करता येतील अशा रीतीने या परिस्थितीला तोंड देण्याची गरज आहे. मूलतः प्रमुख विद्यापीठांना प्रोत्साहन देऊन, आपण, अध्यापन, संशोधन, नवोपक्रम व उपक्रमशीलता या सर्वांचा समावेश करून सुधारित शिक्षणशास्त्र व अध्ययनातील सर्वांगीण दृष्टिकोन यांद्वारे गुणवत्तेत बदल घडवून आणू शकतो. जर आपण हितसंबंध वाढविण्यासाठी व या हितसंबंधातून लाभ मिळविण्यासाठी प्रमुख विद्यापीठे व उच्च शिक्षण पुरवठाकार यांच्यामध्ये व्यवस्थित कार्य करीत राहिलो तर भारतासाठी ही आनंददायी परिस्थिती असेल. या संदर्भात, स्वखर्चाने उच्च शिक्षण घेण्यासाठी मोठया संख्येने भारतीय युवक कसेही करून परदेशात जातात हे मान्य करण्याची आम्हाला गरज आहे. जगातील

प्रमुख विद्यापीठांना आपल्या देशात काम करण्यासाठी आणण्यामुळे केवळ इथल्या शिक्षण क्षेत्रास फायदा होणार नाही तर देशातील लक्षणीय अशी राष्ट्रीय संपत्तीदेखील टिकून राहील.

अशा सहभागामुळे क्षमता वाढीचा परिणाम साधण्यासाठी, भारतातील उच्च शिक्षणाच्या क्षेत्रामध्ये प्रवाहित असणाऱ्या मूल्यांकरिता, योग्य ती काळजी घेऊन, हे क्षेत्र खुले करणे मोलाचे ठरेल. या परिस्थितीमध्ये निःसंशयपणे बदल करतेवेळी, अपुरा दर्जा असणाऱ्या संस्था व तत्त्वशून्य घटक यांना भारतीय उच्च शिक्षणाच्या क्षेत्रात प्रवेश करण्यापासून रोखण्याकरिता योग्य तत्परता दाखविली गेली पाहिजे.

मूलतः प्रमुख विद्यापीठांना प्रोत्साहन देऊन, आपण, अध्यापन, संशोधन, नवोपक्रम व उपक्रमशीलता या सर्वांचा समावेश करून, सुधारित शिक्षणशास्त्र व अध्ययनातील सर्वांगीण दृष्टिकोन यांद्वारे गुणवत्तेत बदल घडवून आणू शकतो.

अशा प्रकारे, सर्वोत्तम संस्थाचालकांना एकत्र आणणे आणि शंकास्पद दर्जा, पूर्वीच्या कामकाजाविषयी शंकास्पद माहिती व शंकास्पद प्रमाणपत्रे असणाऱ्या संस्थाचालकांना दूर ठेवणे या बाबींचे विनियमन करणे ही एक मुख्य गोष्ट आहे. विविध विधेयके व विनियम प्रस्तावित केले गेले असून त्यामध्ये मूल्यांचा ऱ्हास होण्यापेक्षा उच्च शिक्षणातील मूल्यांमध्ये वाढ होईल अशा परदेशी संस्थांना प्रवेश दिला जाण्याची अपेक्षा ठेवली पाहिजे.

परदेशी शिक्षण संस्थांच्या प्रवेशामुळे अल्पावधीमध्येच आपल्या विद्यापीठांना व संस्थांना मोठे आव्हान स्वीकारावे लागण्याची शक्यता असून, यापासून लाभ मिळविण्याकरिता, विद्यापीठे व संस्था यांनी स्वतःला सशक्त, सक्षम बनवण्यासाठी व कार्यरत राहण्यासाठी काळजीपूर्वक काम करण्याची गरज आहे.

महाराष्ट्र शासन, सध्या, राज्यात स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठांची स्थापना करण्यासाठी व त्यांचे कामकाज आणि कार्ये यांचे विनियमन करण्यासाठी तरतूद करण्याकरिता एका

**अशाप्रकारे सर्वोत्तम संस्थाचालकांना एकत्र आणणे आणि शंकास्पद दर्जा, पूर्वीच्या कामकाजाविषयी शंकास्पद माहिती व शंकास्पद प्रमाणपत्रे असणाऱ्या**

विधेयकावर काम करीत आहे. या समितीने, शासनाच्या विचारार्थ, तपशीलवार अभिप्राय दिलेले आहेत. या अहवालात शिफारस करण्यात आल्याप्रमाणे, महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण व विकास आयोगाची स्थापना करून,या आयोगाकडे अशा विद्यापीठाची निर्मिती तसेच ते चालविणे या दोहोंसह विनियामक पर्यवेक्षणाचे काम सोपवता येईल.

**संस्थाचालकांना दूर ठेवणे या बाबींचे विनियमन करणे ही एक मुख्य गोष्ट आहे. विविध विधेयके व विनियम प्रस्तावित केले गेले असून त्यामध्ये मूल्यांचा ऱ्हास होण्यापेक्षा उच्च शिक्षणातील मूल्यांमध्ये वाढ होईल अशा परदेशी संस्थांना प्रवेश दिला जाण्याची अपेक्षा ठेवली पाहिजे.**

'कंपनी अधिनियम, १९५६' याच्या कलम २५ अन्वये नोंदणी झालेल्या एखाद्या कंपनीस असे विद्यापीठ स्थापन करण्यासाठी एक पुरस्कर्ती संस्था म्हणून परवानगी देणे हा मूळ प्रस्तावातील आणखी एक महत्त्वाचा पैलू होता. यामुळे योग्य दिशेने पाऊल उचलले जाईल व ते पुढेही सुरू ठेवले जावे. आपल्यासारख्या विशाल व विविधता असलेल्या देशामध्ये, उच्च शिक्षणासाठी मोठ्या प्रमाणात असलेल्या मागणीचा विचार करता, आपण सरकारी त्याचप्रमाणे योग्य प्रकारे नियंत्रण ठेवून व समतोल साधून खाजगी अर्थसहाय्यित विद्यापीठे अशा दोन्ही प्रकारच्या विद्यापीठांना प्रोत्साहन देणे आवश्यक आहे. कालांतराने, उच्च शिक्षणामधील खाजगी गुंतवणुकीला चालना देण्यासाठी, विशेष अधिनियमाअन्वये शैक्षणिक कंपन्यांकरिता एक आराखडा विकसित करणे प्रस्तुत करता येईल.

## ६.० महाराष्ट्रातील उच्च शिक्षणाची स्थिती.

महाराष्ट्र हे, उच्च शिक्षणाच्या बाबतीत नेहमीच आघाडीवर असून यामागे महाराष्ट्रातील नेते त्याचप्रमाणे समाज यांनी उच्च शिक्षणाला प्राधान्य देण्यावर प्रामुख्याने लक्ष केंद्रित केले आहे, हे त्याचे कारण आहे. महाराष्ट्रात, राज्याचे अनेक कायदे असून ते केंद्रीय धोरण व वैधानिक

दस्तऐवज यांच्याशी अनुरूप आहेत आणि नवनवीन उपक्रम व पुढाकार यांमध्ये अग्रेसर म्हणून देखील महाराष्ट्र राज्य ओळखले जाते.

राज्यामध्ये सर्वप्रथम मुंबई, पुणे व नागपूर या शहरांमध्ये विद्यापीठ संस्कृती होती व त्यानंतर औरंगाबाद, कोल्हापूरमध्ये आणि त्यानंतर राज्यातील इतर ठिकाणी विद्यापीठे उदयास आली. केंद्र सरकारने स्थापन केलेल्या नामांकित संस्था आणि सुप्रसिध्द विश्वस्तमंडळे, संस्था व स्थानिक संस्था यांनी चालविलेल्या अनेक खाजगी संस्था यांनी विद्यापीठांना चांगलेच सहकार्य दिले. मुख्यत्त्वेकरून, संलग्न महाविद्यालयांच्या व्यवस्थेमुळे विद्यापीठांचा विकास झाला व त्यांचा प्रभाव पडला आणि सरळ प्रवेशावर त्याचा मोठा परिणाम झाला आहे. यशवंतराव चव्हाण मुक्त विद्यापीठाच्या रूपाने सुरू झालेल्या मुक्त विद्यापीठाच्या चळवळीने मोठा पुढाकार घेतला असून या चळवळीमुळे, राज्याचा जीईआर जवळजवळ १८% च्या वर गेला आहे.

मुंबई, पुणे या पट्ट्यामध्ये गेल्या काही वर्षात उच्च शिक्षणाच्या विकासावर अधिक लक्ष केंद्रीत केल्याचे दिसून आले आहे. तसेच उद्योगधंद्यानीही त्यांचा वापर केला आहे. उच्च शिक्षणाचे चांगले कार्य दिसून येणारे दुसरे मध्यवर्ती क्षेत्र म्हणून नागपूर, नाशिक, सांगली / कोल्हापूर या पट्ट्यामध्येच केवळ ही बरोबरी साधली गेली आहे.

दक्षिण पूर्व महाराष्ट्र आणि मराठवाडा व विदर्भ यांतील प्रदेश मागे पडले आहेत परंतु ते जलद गतीने सक्षम होत असून, उच्च शिक्षणामध्ये आपले स्वतःचे स्थान मिळविण्याचा प्रयत्न करीत आहेत.

महिला विद्यापीठासह (एसएनडीटी) कृषि विद्यापीठ व वैद्यकीय आरोग्य विज्ञान विद्यापीठ यांनी उच्च शिक्षणामध्ये संस्था निर्माण करून समाजाला सक्षम बनविण्याचा महाराष्ट्रासाठी आवश्यक असलेला विशिष्ट हेतू व लक्ष्य पूर्ण केले आहे.

मनुष्यबळ विकास मंत्रालय, भारत सरकार यांनी २०१० मध्ये प्रसिध्द केलेल्या २००७ च्या आकडेवारीनुसार, महाराष्ट्रात ४२ विद्यापीठे व ३२५८ महाविद्यालये आहेत. पट नोंदणी केलेले एकूण विद्यार्थी ३०.८२ लाख एवढे आहेत. महाराष्ट्रचा जीईआर १८ एवढा आहे.

-------------नकाशा------------

पदवी व पदव्युत्तर अशा दोन्हीही विद्यार्थ्यांनी कला व वाणिज्य शाखांमध्ये नाव नोंदणी केली असून त्यामुळे त्यांची संख्या वाढली आहे,  हे अपेक्षित आहे. परंतु व्यावसायिक शिक्षणाचा अभाव व कौशल्य वाढीतील कमतरता यामुळे बहुसंख्य विद्यार्थ्यांना त्यांचे उच्च शिक्षण पूर्ण झाल्यावर रोजगार पुरविण्यामध्ये मर्यादा पडतात.

गुणवत्ता तसेच शैक्षणिक सुविधांचा प्रसार व माहिती व सूचना तंत्रज्ञानासंबंधातील पायाभूत सुविधा यांमध्ये संपूर्ण राज्यात प्रचंड तफावत आहे.  उच्च शिक्षण संस्थांमधून पदवी घेणाऱ्या विद्यार्थ्यांच्या रोजगाराचा प्रश्न ही  एक मोठी समस्या बनली आहे.

-------------नकाशा------------

## महाराष्ट्र सरकारी विद्यापीठीय अधिकारक्षेत्र, विस्तार व संलग्न महाविद्यालयांची संख्या

उपरोक्त नकाशावरून विद्यापीठ व्यवस्थेतील महत्त्वाची आव्हाने स्पष्टपणे सूचित होतात. मुंबई, पुणे आणि नागपूर या विद्यापीठांमधील संलग्नीकरण व्यवस्थेमुळे या विद्यापीठांवर कार्यचालन, प्रशासन यांमधील आव्हानांचा तसेच स्थानिक महाविद्यालय दर्जाबाबतच्या अपेक्षांचा भार पडत असून परिणामी सर्व हितसंबंधितांना आणि बहुसंख्य समाजाला व्यापक तसेच निम्न अशा दोन्ही स्तरांवर सुधारणा अपेक्षित आहे. औद्योगिकीकरण, विकासाची उद्दिष्टे, आर्थिक परिमाणे आणि अगदी सहज असा तंत्रज्ञानाचा प्रवेश या संदर्भातील प्रादेशिक तफावतीमुळे तशाच प्रकारचे विविधांगी दृष्टिकोन व कार्यतंत्र अवलंबावे लागते. त्यामुळे विविधांगी दर्जा व संबद्ध प्रश्न समोर येत आहेत.

### विद्यापीठ अनुदान आयोगानुसार (सार्वजनिक ) विद्यापीठांची प्रतवारी

| | | |
|---|---|---|
| १. | श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महिला विद्यापीठ, मुंबई | पंचतारांकित |
| २. | मुंबई विद्यापीठ | पंचतारांकित |
| ३. | पुणे विद्यापीठ | ए |
| ४. | डॉ.बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद | बी+ |
| ५. | राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ | बी |
| ६. | शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर | बी |
| ७. | उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव | बी |
| ८. | स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड | बी |
| ९. | संत गाडगे बाबा अमरावती विद्यापीठ | बी |
| १०. | कवी कुलगुरु कालीदास संस्कृत विश्वविद्यालय, नागपूर | बिगर मानांकित |

**विद्यापीठ अनुदान आयोगानुसार अभिमत विद्यापीठांची प्रतवारी**

| | | |
|---|---|---|
| १ | इंदिरा गांधी विकास संशोधन संस्था, मुंबई | ए++ |
| २ | गोखले राज्यशास्त्र व अर्थशास्त्र संस्था, पुणे | ए+ |
| ३ | टाटा समाजविज्ञान संस्था, मुंबई | ए |
| ४ | आंतरराष्ट्रीय लोकसंख्याशास्त्रे संस्था, मुंबई | बिगर मानांकित |
| ५ | केंद्रीय मत्स्यव्यवसाय शिक्षण संस्था, मुंबई | बिगर मानांकित |
| ६ | युद्धसामग्री तंत्रज्ञान संस्था, पुणे | बिगर मानांकित |
| ७ | टाटा मूलभूत संशोधन संस्था, मुंबई | बिगर मानांकित |
| ८ | विश्वेश्वरैया राष्ट्रीय तंत्रज्ञान संस्था, (आरईसी) नागपूर | बिगर मानांकित |
| ९ | महात्मा गांधी आंतरराष्ट्रीय हिंदी विश्वविद्यालय, मुंबई | बिगर मानांकित |

**विद्यापीठ अनुदान आयोगानुसार खाजगी अभिमत विद्यापीठांची प्रतवारी**

| | | |
|---|---|---|
| १ | भारती विद्यापीठ, पुणे | ए |
| २ | दत्ता मेघे वैद्यक शास्त्रे संस्था, वर्धा | ए |
| ३ | सिम्बॉयसिस आंतरराष्ट्रीय विद्यापीठ, पुणे | ए |
| ४ | डी.वाय. पाटील विद्यापीठ, पुणे | ए |
| ५ | नरसी मोनजी व्यवस्थापन अभ्यास संस्था, मुंबई | ए |
| ६ | डी.वाय.पाटील विद्यापीठ, नवी मुंबई | ए |
| ७ | डेक्कन महाविद्यालय पदव्युत्तर शिक्षण व संशोधन संस्था, पुणे | बी++ |
| ८ | टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, विद्यापीठ भवन, पुणे | बी+ |
| ९ | प्रवरा वैद्यक शास्त्रे संस्था, अहमदनगर | बिगर मानांकित |
| १० | डी.वाय. पाटील शिक्षण संस्था, कोल्हापूर | बिगर मानांकित |

विद्यापीठ अनुदान आयोगाने केलेल्या, विविध विद्यापीठीय संस्थांच्या प्रतवारीवरून ही वस्तुस्थिती पुढे येते की, बऱ्याच प्रकरणांमध्ये, लेखापरीक्षण व दर्जा निर्धारणाच्या प्रचलित पद्धतीवरून अशा संस्थांमधील सूक्ष्म भेद दिसून येतो.

ज्या संस्थांना ए आणि त्याहून वरचा दर्जा मिळालेला आहे त्या संस्था शहरांमधील किंवा नागरी गटसमूहांमधील आहेत आणि ज्यांना निम्न दर्जा मिळालेला आहे त्या संस्था प्रामुख्याने द्वितीय श्रेणीच्या नगरपालिका क्षेत्रांमधील आहेत. ही संधीही आहे आणि आव्हानदेखील आहे. खाजगी अभिमत विद्यापीठांच्या बाबतीतही हाच प्रकार दिसून येतो.

महाराष्ट्र हे भारतातील इतर काही राज्यांच्या तुलनेत शिक्षण प्रवेश आणि उत्तम सेवायोजन देण्याच्या बाबतीत अत्यंत मजबूत पायाभूत सुविधा असलेले सुस्थित राज्य आहे. ही संपूर्ण पायाभूत सुविधा यंत्रणा, एकल इको व्यवस्था म्हणून राबविण्याचा प्रयत्न करणे महत्वाचे आहे.

ज्ञान, संशोधन व विकास यांचा वापर करण्याकरिता युवकांच्या आकांक्षा आणि व्यवसाय व उद्योग क्षेत्राच्या महत्वाकांक्षा यांना एकत्र आणू शकणारी इको व्यवस्था उभारणे गरजेचे आहे. सशक्त सरकारी सहाय्यातून, जसे पुरेसा निधी पुरवणे, स्पष्ट विनियम करणे, वैधानिक हस्तक्षेपाद्वारे सुधारणा करणे, माहिती व संसूचना तंत्रज्ञानामध्ये गुंतवणूक करणे, सुस्पष्ट व नियंत्रित खाजगी सहभाग उपक्रम, यांसारख्या माध्यमांतून हे साध्य करता येईल.

## ७.० आपल्या परंपरागत पायाभूत सुविधा - विद्यापीठे व संलग्न महाविद्यालये

भारतीय उच्च शिक्षणाचे चित्र म्हणजे एका विद्यापीठाला जोडलेल्या संलग्न महाविद्यालयांची बृहत व्यवस्था- तिच्यामध्ये क्वचितच विद्यापीठ क्षेत्रातील उच्च दर्जाच्या शिक्षण व संशोधन कार्यक्रमाची उणीव आहे, तेथे विकास नवप्रयोग आणि उद्योगशीलता यांचे वातावरण प्रत्यक्षात नाही, ज्ञानाच्या सीमा ओलांडणे आणि समाजाकरिता आणि/ किंवा उद्योगाकरिता अंमलबजावणीयोग्य उपाय विकसित करण्याच्या संदर्भात श्रेष्ठ ठरणा-या उच्च दर्जाच्या संशोधनाचा अभाव असल्यामुळे विद्यार्थ्यांच्या पदवी मिळविण्याच्या आकांक्षेचा अपवाद वगळता विद्यापीठ आणि समाज यांमध्ये खूपच अंतर आहे.

आपणाकडील अनेक विचारवंतांनी व शिक्षण तज्ञांनी या क्षेत्रात सुधारणा घडवण्याचे प्रयत्न केलेले असून देखील आपल्या उच्च शिक्षण व्यवस्थेवर अजूनही ब्रिटीश राजवटीचा अधिक ठसा आहे. परिणामी आपल्या आजच्या उच्च शिक्षण व्यवस्थेमध्ये संलग्न महाविद्यालयांमध्ये ठराविक विषय शिकवण्यावरच मोठया प्रमाणावर भर असतो, आणि वर्गात जे शिक्षण दिले जाते त्याचे प्रत्यक्ष उपयोजन करण्यावर खूपच कमी भर असतो. शिवाय, यांतील अनेक संस्थांमध्ये संशोधन करण्यासारखे वातावरण नसल्यामुळे अध्यापक आणि त्यांचे अध्यापन हे ज्ञानाच्या रुंदावणाऱ्या कक्षांच्या बरोबरीने जात नाही अशा प्रकारे बऱ्याचशा बाबतीत आपली मुले जे शिक्षण घेत आहेत ते, कालानुकुल नाही आणि म्हणून त्यांनी जेवढे योगदान देणे अपेक्षित आहे, त्यामध्ये ती मागे पडतात. अशा प्रकारे महाविद्यालयीन शिक्षण घेऊन बाहेर पडणारे विद्यार्थी हे पुरेसे ज्ञानसज्ज नसतात आणि तत्संबंधित भावी कारकिर्दीकरिता आवश्यक असणाऱ्या बाबींमध्ये ते खूपच मागे पडतात अथवा संभाव्य नियोक्त्यांच्या अपेक्षा ते पूर्ण करू शकत नाहीत. अशा तऱ्हेने उच्च शिक्षणाची आजची अवस्था आणि यात अगोदर वर्णन केल्याप्रमाणे उच्च शिक्षणाची इष्टतम परिस्थिती यांमध्ये फारच मोठी तफावत आहे.

असे असले तरी, स्वातंत्र्य चळवळ, सर्व क्षेत्रांतील सामाजिक सुधारणा आणि जागतिक ज्ञानभांडारामध्ये घातलेली भर यांमध्ये आपल्या अनेक शिक्षण संस्थांनी केलेली मोलाची कामगिरी आपण मान्य केलीच पाहिजे. तथापि, समस्या निवारण क्षमतेच्या अभावी, आपणाकडे समस्या ओळखणारे कार्यकर्ते अनेक आहेत, परंतु त्या समस्या सोडवू शकतील असे तज्ञ अगदी नगण्य आहेत. या टप्प्यावर चीनमधील उच्च शिक्षणाची स्थिती विशद करणे उपयुक्त ठरेल तेथे संपूर्ण उच्च शिक्षण विद्यापीठामध्येच दिले जाते. तेथे संलग्न महाविद्यालये नाहीत सर्व विद्यार्थी विद्यापीठ क्षेत्रांतच राहतात. प्रत्येक विद्यापीठात २५,०००-४०,००० विद्यार्थ्यांच्या शिक्षणाची व राहण्याची सोय असते. एक विद्यापीठ क्षेत्र सुमारे १००० एकर जमिनीवर पसरलेले असते, त्याला जोडूनच विज्ञान व तंत्रज्ञान पार्क असते, जे चारपट मोठे असते. एका विद्यापीठाचा अर्थसंकल्प हा एक अब्ज रेनमिनबी पेक्षा खूपच जास्त असतो.

**भारतीय उच्च शिक्षणाचे चित्र म्हणजे एका विद्यापीठाला जोडलेल्या संलग्न महाविद्यालयांची बृहत व्यवस्था आहे. चीनमध्ये संलग्न महाविद्यालये नाहीत. तेथील संपूर्ण उच्च शिक्षण हे सुमारे १००० एकर जमिनीवर पसरलेल्या विद्यापीठ क्षेत्रांमध्ये दिले जाते. तेथे प्रत्येक विद्यापीठात साधारणतः२५,०००-४०,००० विद्यार्थ्यांच्या शिक्षणाची सोय असते. तसेच त्याला जोडून चारपट मोठे असे विज्ञान व तंत्रज्ञान पार्क असते. प्रातिनिधिकरीत्या, एका चिनी विद्यापीठाचा अर्थसंकल्प हा एक अब्ज रेनमिनबी पेक्षा खूपच जास्त असतो.**

आपल्या देशातील परिस्थिती अगदीच वेगळी आहे, हे स्पष्टच आहे. संलग्न महाविद्यालयांची व्यवस्था अस्तित्वात आली आहे. जमिनीची सद्यपरिस्थिती आणि शिक्षण क्षेत्रात मोठया संधी देण्यातील आव्हान या बाबी विचारात घेता, २१ व्या शतकातील आव्हानांच्या आणि गरजांच्या पूर्ततेसाठी शिक्षणाची समर्पकता व दर्जा वाढविण्याचे ध्येय गाठणे आवश्यक आहे, हे आपण ओळखले पाहिजे.

शिक्षणाबद्दलचा आपला दृष्टिकोन सर्वंकष असावा. असे असले तरी, संलग्न महाविद्यालयांमध्ये शिक्षणाने विशेषता आधुनिक माहिती व संसूचना तंत्रज्ञानाचा वापर करताना सर्वंकष बनण्याचा आटोकाट प्रयत्न केला पाहिजे. पायाभूत सुविधा आणि शिक्षणाबाबतचा व्यापक दृष्टिकोन यांच्याबाबतीत मर्यादा असू शकतील. म्हणूनच, विद्यापीठांनी पार पाडावयाच्या भूमिकेच्या तुलनेत संलग्न महाविद्यालयांनी पार पाडणे अपेक्षित असलेली प्राथमिक भूमिका यात भेद करणे आवश्यक ठरते.

विद्यापीठ क्षेत्रांमध्ये उच्च शिक्षण देण्याची क्षमता वाढवण्यासाठी, जी वस्तुतः महत्त्वाची गरज आहे - आपण प्रयत्नांची पराकाष्ठा केली तरी, तुलनेने खूपच कमी विद्यार्थ्यांना उच्च शिक्षण देणे शक्य होते, ही अपरिहार्य वस्तुस्थिती आपण जाणून घेणे गरजेचे आहे.

विद्यापीठ स्तरावरील शिक्षणाचा प्रारंभिक उद्देश, ज्ञानाधारित सर्वंकष अध्ययन आणि विकास यांचे वातावरण निर्माण करणे हा असावा तर, संलग्न महाविद्यालयांमधील शिक्षणाचा उद्देश, मूलभूत ज्ञान आणि तत्संबंधित व्यावसायिक कौशल्ये यांमध्ये पारंगत असणारा असा सशक्त युवकवर्ग निर्माण करणे, हा असावा. याचा अर्थ, कोणतेही मूल्यांकन करणे नसून बऱ्याच अंशी वास्तवतेची जाणीव करून देणे होय. शक्य होईल तेथवर, अधिकाधिक संलग्न महाविद्यालयांमध्ये आपण संशोधन कार्यक्रमास प्रोत्साहन दिले पाहिजे. तसेच संबधित कौशल्यांसाठी द्वारे खुली असणे, हा विद्यापीठामधील शिक्षणाचा महत्त्वाचा भाग आहे. हे दोन्ही पैलू उच्च शिक्षणाची महत्त्वाची उद्दिष्टे आहेत.

महाराष्ट्रात आणि भारतात नव्याने सुरू करण्यात व स्वीकारण्यात आलेल्या मुक्त विद्यापीठ व्यवस्थेमुळे तिसऱ्या स्तरावर एकूण पटनोंदणीच्या मोठ्या प्रमाणात (सुमारे २० टक्के) पटनोंदणी झाली आहे. जीईआर वाढवण्यासाठी आणि शिक्षणाचे मार्ग विस्तारित करण्यासाठी ही अनौपचारिक नावनोंदणी वाढवणे हे राष्ट्रीय व राज्यस्तरावरील धोरण आहे. संपूर्णपणे वेगळया स्तरावर जेथे लोकांपर्यंत पोहोचणे हा महत्त्वाचा प्रश्न आहे आणि / किंवा निरंतर शिक्षणाचे मौलिक

सामाजिक ध्येय आहे, अशा ठिकाणी उच्च शिक्षणासाठी मुक्त प्रवेश देणे, हा पैलूदेखील सर्वसमावेशकता वाढविण्यामध्ये महत्त्वाची भूमिका बजावतो.

दूर संपर्क यंत्रणा आणि संपर्कव्यवस्था यांच्या सर्वोत्तम प्रगत आवृत्त्यांचा (२ जी व ३ जी) वापर असलेल्या ए-३ संपर्क यंत्रणेमुळे आणि त्याच्या परिणामी, आभासी परिचयामुळे संपूर्णपणे वेगळी आणि गतिमान अशा प्रसरण (deployment) कार्यपध्दती उदयास येत आहेत, त्यांचा प्रत्यक्ष आणि दूरस्थ अशा दोन्ही अध्ययन-अध्यापन पध्दतींमध्ये वापर करता येईल. पारंपरिक दुहेरी प्रकारच्या विद्यापीठामधील तसेच नेहमीची व मुक्त विद्यापीठे यांमधील शिक्षणाच्या दुहेरी पध्दती (नेहमीची व मुक्त शिक्षण पध्दती) यांमधील तफावत आता दूर करता येईल आणि नवयुगातील कार्यपध्दती व कार्यतंत्रे यांचा वापर करून या व्यवस्था एकत्रित करता येतील. यामुळे अध्ययन व अध्यापन यांची मुक्त शिक्षण प्रणाली सुरू होईल. तीमध्ये राहण्याच्या व कामाच्या ठिकाणांशी शिक्षण जोडता येईल. अशाप्रकारे शैक्षणिक व सामाजिक विकासात्मक कार्यपध्दतींना एकत्रित करून व त्यांतील उणिवा दूर करून ए ३ संपर्कयंत्रणेला सर्व कार्यक्रमांमध्ये अंशतः किंवा पूर्णतः सामावून घेता येईल.

**विद्यापीठ स्तरावरील शिक्षणाचा प्रारंभिक उद्देश, ज्ञानाधारित सर्वंकष अध्यापन आणि विकास यांचे वातावरण निर्माण करणे, हा असावा तर, संलग्न महाविद्यालयांमधील शिक्षणाचा उद्देश मूलभूत ज्ञान आणि तत्संबंधित व्यावसायिक कौशल्ये यांमध्ये पारंगत असणारा असा सशक्त युवकवर्ग निर्माण करणे, हा असावा.**

## ८.० शिक्षणाला सामाजिक / राष्ट्रीय शाश्वत विकासाशी जोडून नवीन रूप देणे.

युनेस्कोने दोन कार्यक्रम निश्चित केलेले आहेत, एक म्हणजे, सन २०१५ पर्यंत साध्य करावयाची सहस्त्रकातील विकासाची ध्येये, आणि दुसरे म्हणजे, २००५ ते २०१४ या दशकात शाश्वत विकासाशी शिक्षणाची नाळ जोडणे. भारताने हे दोन्ही कार्यक्रम अंगीकारले आहेत. तथापि, त्यामध्ये अंतर्भूत असलेल्या समस्या सोडवण्यामध्ये आणि ही ध्येये साध्य करण्यामध्ये उच्च शिक्षण कार्यक्रमाचा कमी हातभार लागलेला आहे.

राष्ट्रीय व सामाजिक शाश्वत विकासाबरोबर शिक्षण जोडणे, हे अतिशय कठीण काम आहे. सध्या, एनएसएस, प्रौढ व निरंतर शिक्षण इत्यादींसारखे काही विस्तार कार्यक्रम राबविले जात आहेत. विद्यापीठ अनुदान आयोगाच्या १९७६ च्या धोरणात्मक चौकटीमध्ये विस्तार हे शिक्षणाचे तिसरे परिमाण म्हणून विहित केलेले आहे. अन्य दोन परिमाणे म्हणजे, अध्यापन व संशोधन ही होत. तथापि, विस्तार हे परिमाण नेहमीच ठराविक परिघातच राहिले असून त्याला कोणताही अभ्यासक्रमाचा दर्जा दिलेला नाही. असे होण्याच्या अनेक कारणांपैकी एक प्रमुख कारण असे आहे की, अध्ययन व विकास यांचा अजूनपर्यंत अभ्यासक्रमामध्ये समावेश केलेला नाही आणि अजूनही गुणांवर आधारित औपचारिक वर्गबंदिस्त शिक्षणाचेच वर्चस्व आहे. असे असल्यामुळे ही एक मर्यादा आहे. अध्ययन व विकास ज्यांद्वारे मोजता येईल अशा साधनांची व तंत्रांची शिक्षण व्यवस्थेमधील अनुपलब्धता हे आणखी एक महत्त्वाचे कारण आहे. अध्ययनावर भर देणे ही गोष्ट मान्य करण्यात आली असली तरी, अध्ययनाचा परिणाम म्हणून विकासाच्या कामगिरीच्या निष्पत्तीबाबत तसा दृष्टिकोन स्वीकारण्यात आलेला नाही. म्हणून, स्नातकपूर्व व स्नातकोत्तर स्तरावरील शिक्षणातील विकासात्मक संपादणूक मोजण्याबाबतच्या साधनांवर संशोधन केले जाणे आवश्यक आहे.

**युनेस्काने दोन कार्यक्रम निश्चित केलेले आहेत; एक म्हणजे, २०१५ पर्यंत साध्य करावयाची सहस्त्रकातील विकासाची ध्येये; आणि दुसरे म्हणजे, २००५ ते २०१४ या दशकात शाश्वत विकासाशी शिक्षणाची नाळ जोडणे. भारताने हे दोन्ही कार्यक्रम अंगीकारले आहेत. तथापि, त्यामध्ये अंतर्भूत असलेल्या समस्या सोडवण्यामध्ये आणि ही ध्येये साध्य करण्यामध्ये उच्च शिक्षण कार्यक्रमाचा कमी हातभार लागलेला आहे.**

शिक्षण हे सामाजिक विकास व परिवर्तन यांचे साधन आहे, असे मानले आणि महात्मा गांधीच्या "विकासाकरिता अध्ययन आणि विकासातून अध्ययन" (नई तालीम मधील तथाकथित समन्वय) या संकल्पनेस मूलभूत शिक्षण कार्यपध्दती मानले तर, शिक्षणाचे विद्यमान स्वरूप व पद्धतिशास्त्र यांतील अडचण दूर करता येईल. कार्याधिष्ठित अध्ययनातून हे साध्य करता येईल,

त्यामध्ये उपक्रम, नेमलेले काम व स्थानिक समस्यांवरील (त्या त्या ठिकाणच्या समस्या) प्रकल्पाधारित अभ्यास यांच्या आधारे कार्यपद्धती व फलनिष्पत्ती यांमध्ये सतत सुधारणा होत असते. समाजाला भेडसावणाऱ्या प्रश्नांशी संबंधित विषय निश्चित करणे आणि तंत्रज्ञानाचा वापर करणे तसेच प्रत्यक्ष जीवनातील कामाद्वारे ते प्रश्न सोडवणे असे हे शिक्षण आहे. समस्या निवारण कार्यपद्धतीमध्ये प्रत्येक समस्येकरिता आणि उच्च दर्जाच्या सामाजिकदृष्टया उपयुक्त व उत्पादक कामाद्वारे परिणाम मिळविण्याकरिता अधिकचे ज्ञान व तंत्रज्ञान या मूलभूत गोष्टींची आवश्यकता असते. कार्याधिष्ठित अध्ययनाच्या या दृष्टिकोनामुळे सामाजिक-आर्थिक विकास होतो आणि तो ए-३ शी संबंधित समाजामध्ये आवश्यक असलेला, नवीन शिक्षणविषयक तत्त्वज्ञान व पद्धतिशास्त्र यामधील (विधायक अध्ययन दृष्टिकोन) एक महत्त्वाचा घटक आहे. त्यानंतर शिक्षण हे राहण्याच्या व कामाच्या ठिकाणांशी व समस्यांशी जोडले जाते. विद्यार्थ्यांना आपले स्वतःचे आणि सामाजिक प्रश्न सोडवण्यामध्ये सहाय्यकारी ठरेल अशी भूमिका महाविद्यालयांना व विद्यापीठांना पार पाडता येईल. जे मुख्यतः स्वातंत्र्यपूर्व काळाचा वारसा आहे, अशा शिक्षणाच्या सध्याच्या स्वरूपापासून, तंत्र-सामाजिक विकास व परिवर्तन यांकरिता ए ३ व एल ३ समाजामध्ये कार्य केंद्रित अध्ययनाधारित नवीन शिक्षणाकडे उत्तरोत्तर संक्रामित होत जाईल, असा दृष्टिकोन स्वीकारण्याचे समितीने प्रस्तावित केले आहे. विद्यार्थ्याच्या क्षमता व सामर्थ्य यांच्या विकासाला अधिकाधिक सहकार्य करण्याकरिता सतत प्रयत्न झाले पाहिजेत. विद्यार्थ्यांने वैयक्तिक व सांघिकरीत्या मिळवलेल्या कामगिरीच्या फलितांची वैयक्तिक व सामाजिक संपत्तीत भर पडू शकते किंवा त्यामुळे अशी संपत्ती निर्माण होऊ शकते. यामुळे विद्यार्थ्यांना अध्ययन करण्यास तसेच त्याने /तिने आतापर्यंत मिळवलेल्या ज्ञानाची ज्ञानभांडारात भर घालण्यास मदतच होते. हा शिक्षणाला सामाजिक परिवर्तनाशी जोडणारा मूळ दृष्टिकोनदेखील आहे.

**विद्यमान शिक्षणप्रणालीतून की-जी स्वातंत्र्यपूर्व काळातील देणगी होती- ए ३**

नवीन शिक्षणप्रणालीने ज्यांचा प्रसार व वापर २१ व्या शतकाशी निगडित असलेल्या

समाजाकरिता करता येईल अशा अनेक नव्या कार्यपध्दती आणल्या आहेत. प्रथमतः विकास ही एक बहुआयामी प्रक्रिया असून चांगल्या परिणामासाठी त्यामध्ये एकत्रित व सामुदायिक कार्यपध्दतीची आवश्यकता असते. म्हणून येथे

**आणि एल ३ समाजाच्या कार्याभिमुख नवीन अध्ययन प्रणालीकडे तांत्रिक, सामाजिक विकास आणि रुपांतरणाची वाटचाल करता येईल असा दृष्टिकोन अंगीकारण्याचे समितीने प्रस्तावित केले आहे.**

एकत्रित सहकारी कार्यप्रणालीची व अध्यापनाची आवश्यकता असते. या कार्यपालनामधून जी निर्मिती होते तिला बाजारमूल्य किंवा व्यापारीमूल्य असते आणि त्यामुळे आर्थिक किंवा द्रव्यविषयक नसेल अशा स्वरूपाची सुबत्ता निर्माण होण्यास सहाय्य होते. अशा प्रकारचे निर्मितीमूल्य हे लहान अथवा मोठ्या गटाचे असल्यामुळे त्यात एका गटाचे अथवा सामाजिक सुबत्तेचे अंशदान असते आणि जे सामाजिक अध्ययन आणि सर्व संबंधितांनी विभागून घ्यावयाच्या विकासात्मक समृद्धी म्हणून जतन करता येऊ शकते. ही कार्यपध्दती "विकिपिडीया" किंवा "यू ट्यूब" अशा साधनाचा वापर करून जन-सहयोगी करता येईल. सामुदायिक सहयोगामुळे सामाईक अधिकारांची निर्मिती होते आणि सामाजिक संघटनेची ताकद व एकत्रित कृतीची क्षमता यात वाढ होऊन सामान्य हितसंबंधाच्या गोष्टी प्राप्त करता येतात. या सर्व प्रक्रियांमुळे नवीन शिक्षण हे पूर्णतः भिन्न ठरते आणि नवीन युग निर्माण करण्याचे अधिकार समाजाला प्रदान करते (तिसऱ्या समितीच्या अहवालामध्ये यावर आणखी विस्तृत चर्चा करण्यात आली आहे.)

## ९. ज्ञानाधिष्ठित अभिनव उपक्रम, माहिती व संसूचना तंत्रज्ञान सहाय्यभूत समाज, ए३ संबंधित समाज

अल्बर्ट आईन्स्टाईनने असा अभिप्राय नोंदवला आहे की, समस्या या ज्या स्तरावर निर्माण होतात त्याच जाणिवेच्या स्तरावरून त्या सोडवता येत नाहीत.

उच्च शिक्षणाशी संबंधित समस्यांची तीव्रता आणि त्यावर उपाय शोधून काढून त्यांची अंमलबजावणी करण्यासाठी मूलभूत बदल करण्याची, चौकटीबाहेर जाऊन विचार करण्याची व ज्ञानाधिष्ठित अभिनव उपक्रमांची आवश्यकता आहे. असे अभिनव उपक्रम तरुणांकडून विकसित

होतील व पार पाडले जातील, कारण त्यांनी आपल्या आत्मोन्नतीसाठी संशोधन व विधायक काम करण्याकरिता तसेच कमीत कमी किंवा अजिबात भौतिक साधने न वापरता ज्ञानाधारित उपाय शोधण्यासाठी ज्ञान आत्मसात केले आहे. सामाजिक परिवर्तन करण्याकरिता ते स्वतःला वाहून घेतात.

अंगभूत विकासप्रक्रिया असलेल्या उच्च शिक्षण प्रणालीच्या अभूतपूर्व संयोगीकरणामुळे आर्थिक व सामाजिक परिवर्तन करण्याकरिता या तरुण मनांच्या आत्मोन्नतीसाठी आणि त्यांच्या कल्पनाशक्तीचा विकास करण्यासाठी मार्गदर्शन करणे, यास उच्च शिक्षणाच्या प्रमुख विचारवंतांनी व धुरिणांनी अग्रक्रम दिला आहे. अशा दीर्घकालीन समस्यांवर, तज्ञांचा अभाव असलेल्या, मर्यादित बुध्दिमत्तेतून उद्‌भवणाऱ्या पारंपरिक दृष्टिकोनातून कल्पनारम्य, चांगला, स्वस्त, जलद आणि सहज उपलब्ध उपाय शोधता येणे शक्य होणार नाही, हे आता सर्वच मान्य करतात. याकरिता मूलभूत संशोधन, अतिकुशल तज्ञ व्यक्ती आणि सामूहिक सहयोगी बुध्दिमत्ता यांचीच गरज असते. उच्च शिक्षणाचे आणि संशोधन संस्थांचे हे मूलभूत उद्दिष्ट झाले आहे. विद्यार्थी आणि शिक्षक या समस्यांवर उपाय शोधण्यासाठी प्रत्यक्ष कार्यपध्दतीमध्ये सहभागी होऊन माहिती मिळवू शकतात आणि कामातून अंतर्दृष्टी मिळवून त्यांना त्या ज्ञानाचा अधिक विधायक कामासाठी वापर करता येईल.

**परिस्थिती पालटणाऱ्या धोरणासाठी आणि वेगाने संपत्ती निर्माण करण्यासाठी प्रमुख असलेल्या अभिनव उपक्रमासह आपल्याला मोठ्या प्रमाणावर नवीन अर्थव्यवस्था निर्माण करावयाची आहे. अशा पध्दतीमुळे मोठे गट- जे तरुणांच्या शिक्षणामध्ये मोठ्या प्रमाणावर गुंतलेले आहेत, ज्ञानाचा प्रसार करण्यासाठी संशोधन करीत आहेत आणि सामाजिक परिवर्तनाचे चक्र प्रवर्तित करण्यासाठी कल्पना लढवित आहेत किंवा वाणिज्यिक उत्पादनांमध्ये उद्योजकता दर्शवत आहेत, वैयक्तिक भेदभाव विसरून उदारमनाने आणि तत्परतेने एकत्र काम करीत आहेत - यांना सहाय्य मिळेल.**

आपण सध्या ज्ञानाधिष्ठित अर्थव्यवस्थेच्या युगात आहोत. या नवीन युगात टिकून राहण्यासाठी आपल्याला मोठ्या संख्येने ज्ञानी लोक तयार करण्याची गरज आहे, जे या नवीन क्षेत्रात मोलाचे योगदान देतील, हे आव्हान स्वीकारण्यासाठी दर्जेदार उच्च शिक्षण मिळणे ही या काळाची गरज आहे.

परिस्थिती पालटणाऱ्या धोरणासाठी आणि वेगाने संपत्ती निर्माण करण्यासाठी प्रमुख असलेल्या अभिनव उपक्रमासह आपल्याला मोठ्या प्रमाणावर नवीन इको-व्यवस्था निर्माण करावयाची आहे. अशा पध्दतीमुळे मोठे गट-जे तरुणांच्या शिक्षणामध्ये मोठ्या प्रमाणावर गुंतलेले आहेत, ज्ञानाचा प्रसार करण्यासाठी संशोधन करीत आहेत आणि सामाजिक परिवर्तनाचे चक्र प्रवर्तित करण्यासाठी कल्पना लढवित आहेत किंवा वाणिज्यिक उत्पादनांमध्ये उद्योजकता दर्शवित आहेत, वैयक्तिक भेदभाव विसरून उदारमनाने व तत्परतेने एकत्र काम करीत आहेत-यांना सहाय्य मिळेल.

अभिनव उपक्रमाचे लक्ष्य केवळ पैसा मिळविणे हे नसावे, तर अंगभूत विकास साधून शक्य तेवढा पैसा मिळविणे हे असले पाहिजे. याकरिता विद्यापीठाच्या विभिन्न विद्याशाखांमध्ये खऱ्या अर्थाने संशोधन करण्याकरिता शिष्यवृत्ती देणे आवश्यक आहे. असे प्रयत्न हे कोणत्याही विकसित समाजाचे अत्यावश्यक अंग आहे व त्यामागे त्यांची स्वतःची ठोस कारणमीमांसा असते.

शिक्षणाच्या क्षेत्रात डिजिटल क्रांतीमुळे बऱ्याच महत्त्वाच्या संधी उपलब्ध करून दिल्या आहेत. त्यामुळे शिक्षक आणि विद्यार्थी यांमधील भौतिक अंतर कितीही असले तरी, वास्तविक वर्गाच्या माध्यमातून त्यांना एकत्र जोडणे आता शक्य झाले आहे. एका संस्थेत विकसित केलेली विषयवस्तू इतर असंख्य संस्थांमध्ये संदर्भासाठी उपलब्ध होऊ शकते. विद्यार्थी त्याच्या / तिच्या आवडीच्या ठिकाणी व तिला योग्य वाटेल अशा वेळी एखाद्या अभ्यासक्रमाचे परीक्षण करू शकतात.

**शिक्षणाच्या क्षेत्रात डिजिटल क्रांतीने बऱ्याच महत्त्वाच्या संधी उपलब्ध करून दिल्या आहेत. शिक्षण हे आता अधिक लवचिक आणि सुलभ अध्यापनाभिमुख झाले आहे. सध्या अस्तित्वात असलेल्या नवीन तंत्रज्ञानाच्या संभावित गोष्टींना प्रभावीपणे तोंड देता येणे हे आपल्यापुढील एक मोठे आव्हान आहे.**

ग्रंथालयीन साधनसामग्री आता पाठ्यपुस्तक, दृक-श्राव्य इत्यादी माध्यमांमध्ये डिजिटल रूपात उपलब्ध आहे आणि डिजिटल स्टोरेज मिडिया, केबल आणि इंटरनेटच्या माध्यमातून ती सहज उपलब्ध होऊ शकते. असे ज्ञान आणि माहितीची साधने आता विकी (wiki) प्रक्रियेचा भाग झाली आहेत आणि यामुळे प्रत्येकाला लाभ घेण्यासाठी तसेच स्वतःचे योगदान देण्यासाठी खुले व्यासपीठ मिळाले आहे. शिक्षण हे आता अधिक लवचिक आणि सुलभ अध्यापनाभिमुख झाले आहे. हे जरी महत्त्वाचे असले तरी देखील, सध्या अस्तित्वात असलेल्या नवीन तंत्रज्ञानाच्या संभावित गोष्टींना आता प्रभावीपणे तोंड देणे हे आपल्यापुढील एक मोठे आव्हान आहे.

नवीन नमुन्याचे आणखी वैशिष्ट्य म्हणजे नव्याने उदयास येत असलेला ए ३ संबंधित समाज (कोणीही, कुठेही व कधीही) जो नव्याने उदयास येत आहे. खुल्या साधनांचा कधीही, कोणालाही वापर करता येणे शक्य असल्यामुळे कोणीही त्याला वाटेल त्या वेळी आयुष्यभर कधीही कुठलीही गोष्ट शिकू शकतो.

अलिकडेच प्रसिध्द झालेले क्लेटन ख्रिस्टनसन आणि हेन्री आयरिंग लिखित "नाविन्यपूर्ण विद्यापीठ"(इनोव्हेटिव युनिव्हर्सिटी) (जॉन विले अँड सन्स, २०११) या पुस्तकामध्ये विघातक तंत्रज्ञान, ऑनलाईन अध्ययन या बाबी उच्च शिक्षणामध्ये अंतर्भूत आहेत, ही गोष्ट उघडकीस आणली आहे. यामुळे नफेखोरी करणाऱ्या आणि पारंपरिक नफेखोरी न करणाऱ्या संस्थांना, उच्च शिक्षणाच्या संपूर्ण पारंपरिक साच्याचा पुनर्विचार करण्यास मुभा मिळेल. असे नाट्यमय बदल एका

दशकातदेखील घडू शकतील. आणि म्हणून, आपल्या उच्च शिक्षणाच्या धोरणामध्ये अशा बदलांना सामोरे जाण्यासाठी अंगभूत गतिशीलता असली पाहिजे.

**१०.० विद्यापीठ क्षेत्र : भारताच्या भावी अभिनव इकोव्यवस्थेचा बहुउद्देशीय आधार**

**एक सर्वसमावेशक इकोव्यवस्था**

**विद्यापीठक्षेत्राने पदवीपूर्व विद्यार्थ्यांना प्रगत संशोधनासह उच्च दर्जाचे शिक्षण द्यावे आणि त्यांना समाज व सभोवतालचे उद्योग यांच्या दैनंदिन व्यवहाराचा सामना करण्यास सक्षम बनवावे, पदव्युत्तर शिक्षणामध्ये लक्षणीय संशोधन आणि समस्यापूर्ती कार्यक्रमासह सर्वोत्तम ज्ञान द्यावे. यामध्ये वेगवेगळ्या क्षेत्रातील पात्रता व प्रगत कौशल्यांचा अंतर्भाव असावा. विद्यापीठ क्षेत्रातील संशोधक तावून सुलाखून तयार करावेत, जेणेकरून नवीन योजना व उपक्रम यांना चालना मिळेल आणि जे समाज / उद्योगासाठी नवीन तंत्रज्ञान / नवीन उपाय शोधून काढतील**

एक सर्वसमावेशक विद्यापीठ हे तुमच्यातील कौशल्याला भरपूर वाव देणारे, अद्ययावत शैक्षणिक कार्यक्रम असलेले विद्येचे माहेरघर असते. जे तुमच्या ज्ञानात भर घालते, तसेच संशोधनाला वाव देते आणि अद्ययावत तंत्रज्ञानाचा शोध लावते, जेणेकरून समाजामध्ये कोणत्याही आव्हानाचा सामना करता येईल, नवनवीन शोध लावता येतील आणि नवीन संधी उपलब्ध झाल्यामुळे विद्यार्थ्यांना आयुष्यभर शिकत राहण्याची कला आत्मसात करता येईल. हे उद्दिष्ट साध्य करणे, हीच दर्जेदार उच्च शिक्षण कार्यक्रमाची मूलभूत गरज आहे. या प्रयोजनासाठी समाज आणि उद्योग याच्याशी संबंधित नवीन इको-व्यवस्थेचा संपूर्ण परिघाचा अंतर्भाव असणाऱ्या सर्वांगीण कार्यक्रमांचा मेळ घालता येईल, अशा पायाभूत सुविधा विद्यापीठ-क्षेत्रात असणे गरजेचे आहे.

**अध्ययन आणि संशोधनाच्या पायाभूत सुविधा**

आपल्या विद्यापीठ क्षेत्राच्या पायाभूत सुविधांमध्ये वाढ केली पाहिजे आणि सर्वांगीण शैक्षणिक वातावरणाचा परिपोष करण्यासाठी व ते टिकवून ठेवण्यासाठी त्याचा पुरेपूर वापर करता

आला पाहिजे, अशी समिती जोरदार शिफारस करीत आहे. अशा वातावरणात स्नातकपूर्व विद्यार्थ्यांना दर्जेदार शिक्षण मिळेल व प्रगत संशोधनाच्या कक्षा रुंदावतील, तसेच सभोवतालचा समाज व उद्योग यांच्या दैनंदिन व्यवहारांचा सामना करता येईल. पदव्युत्तर शिक्षणामध्ये लक्षणीय संशोधन आणि समस्यापूर्ती कार्यक्रमांसह सर्वोत्तम ज्ञान द्यावे. यामध्ये वेगवेगळ्या क्षेत्रातील पात्रता व प्रगत कौशल्यांचा अंतर्भाव असावा, विद्यापीठ क्षेत्रातील संशोधक तावून सुलाखून तयार करावेत, जेणेकरून नवीन योजना व उपक्रम यांना चालना मिळेल आणि जे समाज / उद्योगासाठी नवीन तंत्रज्ञान / नवीन उपाय शोधून काढतील.

**सामाजिक बांधिलकीचा नमुना**

विद्यापीठात समाजाशी संबंधित ज्ञान देण्याचा प्रयत्न करून सामाजिक बांधिलकीदेखील जपता येते. अशा विद्यापीठांमधील ज्ञानशाखांमध्ये, समाजाला भेडसावणाऱ्या समस्यांना तोंड देण्यासाठी एकत्रितपणे व आंतरिक शिस्तीने कसे प्रयत्न करावेत या दिशेने अध्यापन व संशोधन करावे. अशी उद्दिष्टे गाठण्यासाठी, सामाजिक विकासाकरिता काम करणारे उद्योग व संस्था विद्यापीठक्षेत्रामध्ये किंवा नजीकच्या क्षेत्रात असाव्यात आणि त्या, विद्यापीठाचे विद्यार्थी व तज्ञ मंडळी यांनी परिपूर्ण असाव्यात. खाली दिलेल्या आकृतीमध्ये भाभा अणुसंशोधन केंद्रात विकसित करण्यात आलेला ग्रामीण भागातील बंधुभाव जपण्यासाठी विद्यापीठीय कार्यक्रमांचा नमुना दिला आहे. (सिलेज-शहर आणि ग्रामीण भागातील सर्वोत्तम गोष्टींचा मिलाफ असलेली इकोव्यवस्था-ग्रामीण भारताच्या विकासासाठी आदर्श नमुना) अशा पायाभूत सुविधांमुळे वास्तव जीवनाशी संबंधित सर्वांगीण अभ्यास करता येतो, समाजापुढील समस्या सोडविण्यासाठी विद्यापीठ क्षेत्रातील संशोधनाला तशी दिशा देता येते. अशा संशोधनातून बंधुभाव, विकास व विद्यापीठक्षेत्राच्या कामाचे प्रात्यक्षिक या आणखी वाढणाऱ्या लाभदायक गोष्टी आहेत.

--------- नकाशा--------

--------- नकाशा--------

असे विद्यापीठ क्षेत्र हे शिक्षण, संशोधन, विकासाच्या बाबतीतील सोयी तसेच एका बाजूला समाजापल्याड कार्यक्रम आणि शालेय शिक्षण, वैद्यकीय, क्रीडा व करमणूक विषयक सुविधा तसेच पतीपत्नीसाठी रोजगार /कामाच्या संधी यांसह नागरी सुविधा या अनुषंगाने स्वयंसिध्द असावे. हे महत्वाचे आहे की, अशा आणि इतर शक्यतांमार्फत, सक्षम युवकांना लाभप्रद कारकीर्द आणि

उद्योजकता यांची संधी तसेच ग्रामीण भारतातील समाधानकारक उच्चतम जीवनशैली गवसण्यासाठी आम्ही आकर्षित करू. यामुळे ग्रामीण विकासाची गती वाढेल तसेच नागरी क्षेत्रांतील स्थलांतरास खीळ बसण्यास ते उपयोगी ठरेल. ग्रामीण भागांमधील नवीन विद्यापीठक्षेत्रामध्ये या आदर्श नमुन्याचे अनुकरण करावे.

**औद्योगिक आणि व्यवसाय संस्थांमध्ये काम करणे**

एखाद्याला असेच तत्त्वज्ञान अनुसरून नागरी क्षेत्रांमध्ये विद्यापीठ क्षेत्राचा विकास करण्याकरिता आदर्श नमुना विकसित करता येऊ शकेल. संबंधित उद्योगांनी विशेषतः त्यांच्या संशोधन व विकास विभागाने अशा प्रकारे विद्यार्थ्यांना संधी देण्यासाठी आणि उद्योगासंबंधी उद्योग पुरस्कृत संशोधन, अभिनव उपक्रम आणि उपक्रमशीलता यांमध्ये सहभागी होण्यासाठी विद्याशाखा म्हणून विद्यापीठ क्षेत्रामध्ये उपस्थित रहावे आणि काम करावे. उद्योगाच्या संदर्भात, आम्ही आमच्या प्रत्येक विद्यापीठ क्षेत्रामध्ये संशोधन केंद्र स्थापन करण्याचा विचार करीत आहोत. वरवर पाहता, चीनमध्ये अशा प्रकारची ३०० संशोधन केंद्रे आहेत. भारतात आपल्याकडे चेन्नई येथे आयआयटी मद्रास हे एक केंद्र आहे. शासकीय संरचना आणि विद्यापीठ व उद्योग संस्था यांच्यामध्ये परस्पर संबंध ठेवण्याची पध्दत ही दोन्ही बाजूच्या फायद्यासाठी कायमस्वरूपी अभिनव उपक्रम संस्कृतीची सुनिश्चिती करण्यासाठी काळजीपूर्वक संकल्पित करण्याची गरज आहे. विशेष आर्थिक क्षेत्रांची संकल्पना मुळापासून रुजवण्यासाठी अभिप्रेत असलेल्या अशा प्रत्येक विशेष आर्थिक क्षेत्रांमध्ये सर्वंकष विद्यापीठ क्षेत्र स्थापन करणे महत्त्वाचे असेल. तसे उद्दिष्ट नजरेसमोर ठेवले आहे. अशा विद्यापीठक्षेत्रामधील अध्ययन व संशोधन हे अनौपचारिक अध्ययनाचे स्वरूप न गमावता विशेषतः,

विशेष आर्थिक क्षेत्रांमधील उद्योगाच्या गरजांभिमुख असावे. विद्यापीठक्षेत्रात आणि त्यालगत असणारे अनेक उद्योग विद्यार्थ्यांच्या दृष्टीने अध्ययन प्रक्रियेच्या मूल्यात भर टाकतील.

**विद्यापीठक्षेत्रांमध्ये एखाद्या विद्यापीठ यंत्रणेच्या दृष्टिकोनाची व्याख्या करणे**

येथे आपल्याला विद्यापीठाची स्थापना करणे आणि एखाद्या विद्यापीठक्षेत्राची स्थापना करणे यामध्ये भेद करणे गरजेचे आहे. विद्यापीठक्षेत्र स्थापन करण्यावर समितीचा भर राहील. तसेच अशा प्रत्येक विद्यापीठक्षेत्राने वर वर्णन केलेली वैशिष्ट्ये आत्मसात करावीत. प्रत्येक विद्यापीठाकडे एक किंवा अनेक विद्यापीठक्षेत्रे असली तरी परिपूर्ण विद्यापीठक्षेत्राविना विद्यापीठाचा विचार करण्यात येऊ नये. महाराष्ट्रासारख्या मोठ्या व औद्योगिकदृष्ट्या प्रगत असलेल्या राज्यात विद्यमान मोठी विद्यापीठक्षेत्रे संख्येने फारच कमी आहेत. (केवळ २ विद्यापीठक्षेत्रे ६०० एकर पेक्षाजास्त जागेत आहेत आणि २०० एकरच्या परिक्षेत्रात ४ विद्यापीठक्षेत्रे आहेत.) म्हणून विद्यमान विद्यापीठक्षेत्रे समृध्द करण्यासाठी व अधिकाधिक प्रगतिपथावर आणण्यासाठी अधिक विद्यापीठक्षेत्रे स्थापन करणे गरजेचे आहे. परिणामी, एखादा प्रत्येक जिल्ह्यामध्ये एक विद्यापीठक्षेत्र असावे असे उद्दिष्ट कोणीही ठेवू शकतो. यामुळे, स्थानिक गरजा लक्षात घेता, ज्ञान,विकास व मनुष्यबळ साधन कार्यक्रमांवर उचित भर देणे शक्य होईल. नवीन विद्यापीठक्षेत्र स्थापन करताना, भविष्यातील आवश्यकतांवर लक्ष ठेवावे लागेल. नवीन विद्यापीठक्षेत्र हे एखाद्या चांगल्या विद्यमान विद्यापीठक्षेत्राशी जोडणे इष्ट ठरेल, जेणेकरून ते नवीन विद्यापीठक्षेत्रांना समुपदेशन देऊ शकेल.

## अंतर्गत विद्याशाखांवर लक्ष केंद्रित करणे

विद्यापीठ अध्ययन केंद्रस्थान ही संकल्पना अनिवार्यपणे व्यापक असावी हे देखील आपल्याला जाणून घेण्याची गरज आहे. जगभरात अनेक तंत्रविषयक विद्यापीठे आहेत. परंतु, त्या सर्व विद्यापीठांमध्ये केवळ विज्ञानाव्यतिरिक्त मानव्यविद्या व्यवस्थापन, अर्थशास्त्र इत्यादींसारखे सक्षम विभाग आहेत. या विद्यापीठांनी तंत्रज्ञान केंद्रभूत उकली यामधून विकासातील व अंमलबजावणीतील या विद्याशाखांचे महत्त्व जाणले आहे. अशा विद्यापीठाचे क्षेत्र हे नेहमी मोठे असते अथवा इतर तथाकथित सर्वसाधारण विद्यापीठाशी तुलना करता अधिक मोठे असते. उच्च शिक्षणाबद्दलचा आपला दृष्टिकोन, सर्व विद्याशाखांचा समावेश असणारी विद्यापीठक्षेत्रे ही अधिकाधिक वाढीव संख्येत असावीत असा असावा. शक्यतोवर (याअगोदर नमूद केल्याप्रमाणे जिल्ह्यागणिक एक) अशा दृष्टिकोनामुळे विभागामध्ये उच्च शिक्षण व प्रादेशिक विकास यांच्यामधील नाते दृढ होईल. एकल विद्याशाखा आधारित विद्यापीठामध्ये विशिष्ट विद्याशाखेतील सर्व महाविद्यालयांचे केंद्रीभूत संलग्नीकरण हे या तत्त्वज्ञानाला छेद देणारे असेल.

**विद्यमान विद्यापीठक्षेत्रे मोठ्या प्रमाणात समृध्द करण्याच्या आवश्यकतेवर भर देताना समितीला विशेषतः प्रदेशाच्या सध्याच्या व उदयास येणाऱ्या सामाजिक तंत्रज्ञानविषयक गरजांशी संबंधित कार्यक्रम आणि पायाभूत विकास असलेली अधिकाधिक क्षेत्रांची स्थापना करण्यावर देखील भर द्यावासा वाटतो. (शक्यतोवर प्रत्येक जिल्ह्यागणिक एक) विद्यापीठ अध्ययन केंद्रस्थान हे अनिवार्यपणे व्यापक असावे. परिपूर्ण नसलेले एखादे विद्यापीठ अभिप्रेत नसावे.**

**संलग्न असणाऱ्या महाविद्यालयाचा पाठिंबा व विकासविषयक भूमिका**

आपल्या विद्यापीठांशी मोठ्या संख्येने संलग्न असलेल्या महाविद्यालयांचा विचार करता, त्यांनी उद्‌भवणाऱ्या राष्ट्रीय गरजा आणि बदलत जाणारे स्वरूप यासंदर्भात त्यांच्या शिक्षण पध्दतीत, शिक्षणविषयक चालू संशोधन व विकास यात सातत्याने सुधारणा करणे गरजेचे असेल. विकासविषयक संशोधन हा विद्यापीठक्षेत्राचा एक महत्त्वाचा कार्यक्रम असावा. विकास पावणाऱ्या आपल्या सामाजिक पध्दतीशी अनुरूप ठरावी म्हणून आपली शिक्षण पद्धती बदलण्यासाठी सविस्तर धोरणे आखणे गरजेचे आहे. शिक्षणाशी संबंधित कार्यक्रमामुळे संघटनात्मक मर्यादा ओलांडून अध्ययन केंद्रगत ठरावे म्हणून शिक्षणाचा कायापालट करणे सुकर होईल. आपण असेही करावे की, विद्यार्थ्यांनी जेथे आपली नावनोंदणी केली आहे, त्या ठिकाणाव्यतिरिक्त अन्य संस्थांमध्ये काही पाठ्यक्रमांना उपस्थित राहण्यासाठी त्यांची निवड करणे त्यांना शक्य व्हावे. माहिती संसूचना तंत्रज्ञान सहाय्यभूत परीक्षा मंडळ, मॉडयूलर (घटकनिहाय) पाठ्यक्रमसंरचना आणि लवचिक संयुक्त भांडवली बँक यंत्रणा यांमुळे हे कृतीत आणता येईल. संलग्न महाविद्यालयांमधील विद्याशाखांबरोबर सतत अद्ययावतीकरण यामुळे वैयक्तिक विषयांचे अभ्यासक्रम सातत्याने अद्ययावत ठेवण्यास त्याचप्रमाणे विद्यार्थ्यांना वैकल्पिक विषय निवडण्यास व शिक्षक ठरविण्यास मार्गदर्शन मिळेल.

**तंत्रज्ञानाचा झपाट्याने प्रसार होत असल्यामुळे स्वयं अध्ययन पध्दती तयार करणे**

आपणास स्वयं अध्ययन संस्कृतीसाठी देखील पध्दतशीरपणे तरतूद करावी लागेल. ज्ञान आणि शैक्षणिक साधनसंपत्तीशी संबंधित सामाईक प्रक्रियांस सुरुवात झाल्यास ही संस्कृती वाढीस

लागेल आणि समाजापुढील प्रश्न सोडवण्यासाठी आजीवन अध्ययनाचा त्याचप्रमाणे, सामूहिक कामकाजाचा भाग ठरेल.

आपल्या विद्यार्थ्यांनी त्यांच्या आजूबाजूच्या परिस्थितीवर यथोचित लक्ष केंद्रित करून अशा कार्यक्रमाचे एक अविभाज्य भाग ठरावे. ए-३ संबंधित समाजात व अध्यापन करणाऱ्या समाजामध्ये विद्यापीठ समूहामध्ये वैयक्तिकपणे किंवा गटाने किंवा परिवाराने अथवा हितसंबंधित समूहाने काम करताना, स्वयं संघटना व गट-प्रशासन उपयोगात आणणे अत्यावश्यक ठरेल. त्यावर अध्यापकांच्या व मार्गदर्शकांच्या पर्यवेक्षणाची गरज पडणार नाही व गरज पडू शकणार नाही. वस्तुतः ए ३ शी संबंधित राहिल्याने प्रत्येकाला, गटाशी संबंध जोडण्याचे आणि वास्तविकरीत्या किंवा खरोखरी स्थानिक पातळीवर किंवा जागतिक पातळीवर एकत्रित

**द्रव्यविषयक बक्षिसे देऊन प्रेरणात्मक पध्दत तयार करताना, एखाद्या व्यक्तीच्या संज्ञान क्षमतांना आडकाठी येत नाही याची सुनिश्चिती करण्यासाठी यथोचित लक्ष देण्यात यावे. पण त्याचबरोबर अभिनव तत्त्व व इच्छा, यथार्थ सहभाग घेण्याची इच्छा, स्वयंसिध्दता जाणणे यासंबंधात परिपोषण केले आहे, हे पाहावे. हे सर्वश्रुत आहे की, केवळ उपचारात्मक व अपरिवर्तनीय परिमाणात्मक बक्षीस पध्दतीतून फक्त तेच तेच उत्पादन करणारे वातावरण तयार होते आणि जेव्हा ज्ञानावर आधारित कामगिरी पार पाडली जाते तेव्हा उद्दिष्ट प्राप्तीत अडथळा आणण्याकडे तिचा कल असतो.**

काम करण्याचे स्वातंत्र्य मिळते. हे एक नवीन वैशिष्ट्य आणि कार्य आहे, प्रत्येक विद्यापीठाने आणि शिक्षण संस्थेने स्वयं शासन संस्कृतीचे परिपोषण करून प्रचालन करावे आणि भारतीय सांविधानिक मूल्यांच्या आणि तत्त्वांच्या चौकटीत राहून स्वायत्ततेचा किंवा स्वातंत्र्याचा यथोचित वापर करावा.

**संस्कृती म्हणून (३६०) संपूर्ण मूल्यमापन**

आपल्या विद्यापीठांना सर्वोत्कृष्ट म्हणून उत्तेजन देण्यासाठी कार्याधारित मूल्यमापन आणि श्रेणीनुसार बक्षिसे आणि मान्यता या पध्दती दीर्घ काळ चालू ठेवाव्या लागतील. कामगिरीच्या मापदंडाची पारदर्शक रीतीने व्याख्या करण्यात यायला हवी. यामध्ये विद्यापीठाचे संपूर्ण मुख्य कार्यक्षेत्र जसे की, (३६०) संपूर्ण मूल्यमापन प्रक्रियेद्वारे निर्धारित केल्याप्रमाणे अध्ययन समकालीन समीक्षा प्रकाशनांमार्फत स्पष्ट केल्याप्रमाणे संशोधन मान्यताप्राप्त विद्यापरिषदांचे सामान्य सदस्यत्व अशा सारख्या बाह्य समव्यावसायिकांकडून ओळख तंत्रविकासाचा परिणाम आणि तळागाळातील वापरकर्त्यांकडे हस्तांतरण, बाह्यसाधनसंपत्ती वापरून परिवर्तित केल्याप्रमाणे समाजाशी / उद्योगाशी / बाह्यनिधीकरण एजन्सीशी संपर्क, विविध विद्यापीठांचे समारंभ आणि कार्यक्रम इत्यादींसाठी पुरविलेल्या सेवेचा दर्जा यांचा समावेश करावा.

**बक्षीस पध्दती**

बक्षिसे ही, अध्यासनाच्या नावाने, आंतरराष्ट्रीय परिषद इत्यादीमध्ये सहभागी होण्यासाठी प्रागतिक संधी इत्यादी पूर्वघोषित पुरस्काराच्या स्वरूपात असू शकतात. शासकीय मानकांनुसार भरपाई भरून काढणारी इतर द्रव्यविषयक बक्षिसे असू शकतात. ही बक्षिसे विद्यापीठाने अशासकीय साधनसंपत्तीमार्फत संघटित केलेल्या निधीमधून देता येतील. द्रव्यविषयक बक्षिसे देऊन प्रेरणात्मक

पध्दत तयार करताना एखाद्या व्यक्तीच्या संज्ञान क्षमतांना आडकाठी येत नाही याची सुनिश्चिती करण्यासाठी यथोचित लक्ष देण्यात यावे. पण त्याबरोबर अभिनव तत्त्व व इच्छा, यथार्थ सहभाग घेण्याची इच्छा,स्वयंसिध्दता जाणणे यासंबंधात परिपोषण केले आहे, हे पाहावे. हे सर्वश्रुत आहे की, अत्यंत उपचारात्मक व अपरिवर्तनीय परिमाणात्मक बक्षीस पध्दती फक्त तेच तेच उत्पादन करणाऱ्या वातावरणात कार्य करते आणि जेव्हा संज्ञानावर आधारित कामगिरी पार पाडली जाते तेव्हा उद्दिष्टप्राप्तीत अडथळा आणण्याकडे तिचा कल असतो.

**साधनसंपत्ती उभारण्याची क्षमता : यथोचित दर्जा निर्देशांक**

विद्यापीठांना आपली स्वतःची साधनसंपत्ती उभारण्यासाठी उत्तेजन दिले पाहिजे. शासनाने देखील याबाबतीत विद्यापीठांना पाठबळ द्यायला हवे. किंबहुना, असे करण्याची क्षमता हा देखील विद्यापीठाच्या कामगिरीचा एक मापदंड असावा. संपूर्ण स्वायतत्ता, प्रसिध्दी आणि समाजाशी व उद्योगाशी असलेली विश्वसनीयता या काही महत्वाच्या गोष्टी आहेत. त्यामुळे साधनसंपत्ती उभारण्याची क्षमता वाढेल.

**माहिती संसूचना तंत्रज्ञान (आयसीटी) : - मूळापासून सुधारणा करण्याची संधी**

आज आपण ए ३ संबंधित समाजाच्या युगात राहात आहोत. नजिकच्या काळात ज्ञान साधनाचा वैश्विक वावर अपेक्षित आहे. त्यास केवळ डिजिटल डिव्हाईडच्या मर्यादा असून त्या लवकरच भरून येण्याची शक्यता आहे. राष्ट्रीय माहिती जाळे हा एक

**राष्ट्रीय माहिती जाळे हा एक महत्वाचा विकास असून ते सध्या कार्यरत होत आहे. महाराष्ट्राने या नव्या शक्यतांचा पूर्णपणे फायदा घेण्यासाठी वेगाने पावले उचलावीत, असा दृष्टिकोन ठेवून महाराष्ट्रातील सर्व विद्यापीठांना**

महत्वाचा विकास असून ते सध्या कार्यरत होत आहे. महाराष्ट्राने या नव्या शक्यतांचा पूर्णपणे फायदा घेण्यासाठी वेगाने पावले उचलली पाहिजेत. या दृष्टिकोनातून महाराष्ट्रातील सर्व विद्यापीठांना खुले अध्यापन व्यासपीठ निर्माण करण्यामध्ये अंतर्भूत करता येऊ शकेल. विकी प्रक्रियेचे महत्त्व दिवसेंदिवस वाढत आहे, अशा खुल्या अध्ययन

**खुले अध्ययन व्यासपीठ निर्माण करण्यामध्ये अंतर्भूत करून घेता येईल. विकी प्रक्रियेचे महत्व दिवसेंदिवस वाढत आहे. अशा खुल्या अध्ययन व्यासपीठाचे समाजाच्या संदर्भात असलेल्या अनेक संशोधन कार्यक्रमांना पाठिंबा देण्यासाठी, संशोधन व्यासपीठामध्ये योग्य रीतीने परिवर्तन करता येईल.**

व्यासपीठाचे समाजाच्या संदर्भात असलेल्या अनेक संशोधन कार्यक्रमांना पाठिंबा देण्यासाठी, संशोधन व्यासपीठामध्ये योग्यरीतीने परिवर्तन करता येईल. अशा प्रकारे आपणांस विद्यापीठक्षेत्रामध्ये, संलग्न महाविद्यालयांमध्ये आणि खुल्या व्यासपीठ प्रक्रियेमार्फत विद्यापीठक्षेत्राचे कार्यक्रम विशेषतः विकासाभिमुख संशोधनाच्या संदर्भात विद्यापीठाशी संलग्न करून विद्यापीठाला विशेष बाबी पुरवून विद्याविषयक आणि संशोधन कार्यक्रमाची सांगड घालण्याचे उद्दिष्ट ठेवले पाहिजे, या पद्धतीने विद्यमान खुल्या विद्यापीठ चौकटीतील काही त्रुटी दूर होतील आणि पाठ्यक्रम शिकविण्याच्या संदर्भात त्यांच्या अनुभवातून शिक्षण पध्दतीस सर्वदूर लाभ होईल. अधिक महत्वाचे म्हणजे, समाजाच्या संदर्भातील संशोधन व विकास क्षमता बहुपयोगी ठरू शकतील.

परिणामी, अशी संलग्नता, विद्यापीठांना त्यांची संपूर्ण भूमिका मांडणे आणि उर्वरित समाजाला विद्यापीठांकडून संपूर्ण लाभ घेणे शक्य व्हावे यासाठी, उद्योग, समाज व शालेय शिक्षण पध्दत यांसह विद्यापीठेतर कार्यक्रमांपर्यंत विस्तारित करण्यात यावी.

## ११.० संलग्न महाविद्यालये : स्वायत्तता, लवचिकता आणि कौशल्य विकास निष्पत्ती याबाबत.

संलग्न महाविद्यालये ही भारतातील उच्च शिक्षणाचा महत्त्वाचा कणा आहे. ही परिस्थिती भविष्यातदेखील कायम राहण्याची शक्यता आहे.

**स्वायत्तता**

संलग्न महाविद्यालयांतून देण्यात येणाऱ्या शिक्षणाच्या दर्जाचे मूल्यमापन करण्यासाठी आणि तो उंचावण्यासाठी अविरत प्रयत्न करण्यात यावेत.

अधिस्वीकृति प्रक्रियेमार्फत विनिर्दिष्ट स्थिरचिन्ह मिळालेल्या महाविद्यालयांना टप्प्याटप्प्याने स्वायत्तता देऊन अधिकाधिक उत्तम कार्य करण्यासाठी उत्तेजन देण्यात यावे. त्यामुळे त्या महाविद्यालयांना, विद्याविषयक कार्यक्रमांचा विकास आणि विद्यार्थी मूल्यमापन प्रक्रिया याच्याबाबतच्या नवकल्पना आणि श्रेष्ठत्व प्रस्थापित करण्यासाठी सहाय्यभूत ठरतील. स्वायत्त महाविद्यालयावर पर्यवेक्षण करण्याचा विद्यापीठाने किमान पर्यवेक्षक करून उच्च श्रेणी संपादन करणाऱ्या महाविद्यालयांना श्रेणीबद्ध करावे. ही श्रेणीबद्ध प्रक्रिया, काहीही झाले तरी, कालबद्ध आढाव्याअंतर्गत करण्यात यावी आणि स्वायत्ततेचा स्तर, दर्जा प्रमाणस्थापित आहे याची सुनिश्चिती करण्यासाठी निर्धारणाचा आधार घेऊन पुनःसमायोजित केला जावा असा दृष्टिकोन एका बाजूस चांगली कामगिरी पार पाडणाऱ्या महाविद्यालयांना, त्याच्या स्वायत्ततेमधील त्यांचे कार्यक्रम नव्या कल्पनेसह पार पाडताना सहाय्यभूत ठरेल आणि दुसऱ्या बाजूस विद्यार्थी

अधिस्वीकृति प्रक्रियेमार्फत विनिर्दिष्ट स्थिरचिन्ह मिळालेल्या महाविद्यालयांना टप्प्याटप्प्याने स्वायत्तता देऊन अधिकाधिक उत्तम कार्य करण्यासाठी उत्तेजन देण्यात यावे. त्यामुळे त्या महाविद्यालयांना,विद्याविषयक कार्यक्रमांचा विकास आणि विद्यार्थी मूल्यमापन प्रक्रिया याच्याबाबतच्या नवकल्पना आणि श्रेष्ठत्व प्रस्थापित करण्यासाठी सहाय्यभूत ठरतील. स्वायत्त महाविद्यालयावर पर्यवेक्षण करण्याचा विद्यापीठाने किमान पर्यवेक्षक करून उच्च श्रेणी संपादन करणाऱ्या महाविद्यालयांना श्रेणीबद्ध करावे. ही श्रेणीबद्ध प्रक्रिया, काहीही झाले तरी, कालबद्ध आढाव्याअंतर्गत करण्यात यावी आणि स्वायत्ततेचा स्तर, दर्जा

| | |
|---|---|
| मूल्यमापनाशी संबंधित विद्यापीठावरील भार कमी करण्यास सहाय्यभूत ठरेल. जरी आम्ही, महाविद्यालयांना, त्यांच्या कामगिरीच्या आधारे अधिकाधिक स्वायत्त करण्याबाबत | प्रमाणस्थापित आहे याची सुनिश्चिती करण्यासाठी निर्धारणाचा आधार घेऊन पुन:समायोजित केला जावा |

प्रगती करत असलो तरी, स्वायत्त महाविद्यालये, स्थानपरत्त्वे संबंधित सामाजिक विकास चौकटीतून सापेक्षतेने अधिकाधिक ज्ञान देणारा दृष्टिकोन आणू शकत असूनही आणि विद्यापीठ कार्यक्रमांचा लाभ मिळणाऱ्या सर्वोकृष्ट प्रथांचा भाग बनू शकत असूनही स्वायत्त महाविद्यालये, विद्यापीठ कामकाजामध्ये अंतर्भूत करायची राहून गेली आहेत. स्वायत्ततेमधील क्रमवर्धी वाढीसह प्रकर्षाचा उच्चतम स्तर गाठणाऱ्या संस्थांची अनेक उदाहरणे आहेत. मुंबईतील इन्स्टिटयूट ऑफ केमिकल टेक्नॉलॉजी हे याचे एक ठळक उदाहरण आहे. परिणामी, श्रेणीबद्ध स्वायत्तता देण्याची ही एकमेव प्रक्रिया विद्यापीठाचा स्वंयपूर्णतेचा दर्जा गाठेपर्यंत शिगेस पोहचेल.

**पदव्युत्तर अध्यापन व संशोधन**

विद्यापीठ क्षेत्रामधील कार्यक्रमाचा मुख्य भाग म्हणून जरी आम्ही पदव्युत्तर शिक्षण व संशोधन यावर जोर देत असलो तरी, महाविद्यालयांमध्ये असे कार्यक्रम चांगल्या रीतीने पुढे चालू राहण्यासाठी त्यांना हरेक संधी देण्यात यावी. अविरत व परिपोषक विद्याशाखा प्रज्ञा, सकारात्मक पदवीपूर्व शिक्षणाचा आघात आणि वाढीव संस्थात्मक प्रकर्ष यांप्रती पुढाकार घेण्यास असे कार्यक्रम सहाय्यभूत ठरतील. अशा कार्यक्रमांमार्फत सामाजिक संबद्धता असणाऱ्या अनेक विद्यार्थी प्रकल्पांना पाठिंबा दिला जाऊ शकतो. महाविद्यालये, विद्यापीठातील आणि इतर शैक्षणिक संस्थांमधील पदव्युत्तर कार्यक्रमांशी त्यांची संलग्नता देखील मजबूत करतील.

**रोजगारक्षमतेसाठीच्या कौशल्यावर भर**

पदवीपूर्व स्तरावर, अशा महाविद्यालयातील शिक्षण, विद्यार्थ्यांचे व्यावसायिक कौशल्य व रोजगारक्षमता वाढविण्यासाठी आटोकाट प्रयत्न करत आहे. या प्रयोजनासाठी अशा

महाविद्यालयांच्या व्यवस्थापनाने बाजारातील नोकरीच्या गरजा ओळखल्या पाहिजेत आणि महाविद्यालयात शिकवल्या जाणाऱ्या प्रत्येक कार्यक्रमामध्ये संबंधित कौशल्य विकासाचा आशय आणला पाहिजे. असे शक्य आहे की, महाविद्यालयीन स्तरावरील विद्यमान विद्याशाखा, असा आशय आणण्यासाठी सुसज्ज करता आली नाही व यातून मार्ग काढण्यासाठी उपांगभूत किंवा अभ्यागत विद्याशाखेचा वापर करावा किंवा आऊटसोर्सिंग(outsourcing)करता येईल.

एका छोट्या महाविद्यालयाद्वारे विद्यार्थ्यांच्या एकसारख्या नानाविध गरजा व निवडी पूर्ण करण्यासाठी आवश्यक पाठयक्रमांच्या नानाविध भागामध्ये विस्तारित शिक्षण देणे नेहमीच अतिशय अवघड आहे. जेव्हा उपजीविका आणि संपत्ती निर्मिती यांच्याशी संबंधित शिक्षणासाठी आवश्यक असणाऱ्या व्यावसायिक व व्यवसाय कौशल्याधारित पाठयक्रमांना विद्यार्थ्यांची पसंती असते, तेव्हा या गोष्टी आणखी कठीण होऊन बसतात. म्हणून शिकणाऱ्या व्यक्तीच्या, त्याच्या/तिच्या विकासातील गरजा व मागण्या, स्वतःच्या

**शिकाऊ व्यक्ती केंद्रित करण्याच्या दृष्टिकोनाचा भाग म्हणून, संपूर्ण शैक्षणिक कार्यक्रम, विद्यार्थ्यांची लेखापरीक्षा करण्याची इच्छा असेल असे पाठयक्रम निवडण्यासाठी विद्यार्थ्यांच्या बाजूने, पदवीसह पत आधारित प्रमाणतेत आणण्यात यावा. ज्या संस्थेत त्यांनी नावनोंदणी केली आहे अशा संस्थेत विनिर्दिष्ट किमान पत ज्या प्रमाणात त्यांनी मिळवलेली आहे तिथपर्यंत पदवी मिळवण्यासाठी आवश्यक असलेल्या गोष्टींची भरपाई करण्यासाठी पत हस्तांतरणासह इतर संस्थांनी देऊ केलेल्या**

**पाठयक्रमांची निवड करण्याचे स्वातंत्र्य त्यांना असावे.**

तसेच सामाजिक-आर्थिक गरजा पूर्ण करण्यासाठी महाविद्यालय भागीदारी जाळ्यांमार्फत देण्यात येणाऱ्या (कन्सोर्टिआ नेटवर्कमार्फत) एकात्मिक शिक्षणाची एक चौकट (आराखडा ) विकसित करणे आवश्यक आहे.

आता बाजारात खाजगी कौशल्याधारित शिक्षण देणाऱ्यांची बरीच संख्या आहे. तरुणांच्या रोजगार क्षमतेनुसार महत्त्वाच्या आवश्यक बाबींची ते पूर्तता करत आहेत. अशा कौशल्याधारित शिक्षण कार्यक्रमाची मध्यवर्ती अभ्यासक्रमाच्या आशयाशी संलग्नता आणि त्याची समवर्ती प्रदानता हा समृद्धपणे योगता आणील आणि तेच त्यांचे ध्येय असावे.

कौशल्य संपादनासाठीची निवड व्यापक करण्याकरिता, समिती, नंतरच्या भागात, कौशल्य विकास संधींच्या भरीव वाढीसाठीचा एक दृष्टिकोन प्रस्तावित करीत आहे. पाठयक्रम आशयाशी संबंधित कौशल्यांची निश्चिती आणि अशा कौशल्य प्रशिक्षणासाठी साधनांची सुसज्जता यांद्वारे महाविद्यालये, संस्था, उद्योग व जवळच्या शसकीय संस्था यादरम्यान एक संयुक्त कार्यक्रम सुरू करण्यात यावा. यासंदर्भात हे महत्त्वाचे आहे की, संबंधित हितसंबंधीत व्यक्तींनी शिखर व्यवस्थापन स्तरासह महाविद्यालयीन कामकाजांमध्ये पुरेसे प्रतिनिधित्त्व केलेले आहे.

प्रत्येक महाविद्यालयाने, सर्व हितसंबंधित व्यक्ती ह्या इच्छित दर्जा व संबद्धता असणाऱ्या आहेत, याची खात्री करण्यासाठी नियतकालिक लेखापरीक्षा प्रक्रियेच्या अधीन असले पाहिजे. तेथे हितसंबंधींच्या प्रतिसादावर आधारित श्रेणीकरणाची प्रक्रिया करण्यात यावी.

**पत प्रमाणता**

शिकाऊ व्यक्तीकेंद्रित दृष्टिकोनाचा एक भाग म्हणून, संपूर्ण शैक्षणिक कार्यक्रम, विद्यार्थ्यांची लेखापरीक्षा करण्याची इच्छा असेल असे पाठयक्रम निवडण्यासाठी विद्यार्थ्यांच्या बाजूने, पदवीसह पत आधारित रचना परिमाणितेत आणण्यात यावा. (मॉडयुलराइझ). ज्या संस्थेत त्यांनी नावनोंदणी केली आहे, अशा संस्थेत विनिर्दिष्ट किमान पतसंख्या जोपर्यंत त्यांनी मिळवलेली

आहे तोपर्यंत पदवी मिळवण्यासाठी आवश्यक असलेल्या गोष्टींची भरपाई करण्यासाठी पत हस्तांतरणासह इतर संस्थांनी देऊ केलेल्या पाठयक्रमांची निवड करण्याचे स्वातंत्र्य त्यांना असावे.

## १२.० कौशल्याधारित विकास संधींच्या भरीव वाढीसाठी कार्यक्रम

समिती, पदवीपूर्व विद्यार्थ्यांसाठी विद्यमान अभ्यासक्रमात आणखी भर म्हणून कौशल्याधारित विकास कार्यक्रमाची (सॉफ्ट कौशल्ये तसेच हार्ड कौशल्ये या दोन्ही) यांची शिफारस करते. विद्यार्थी महाविद्यालयातून बाहेर पडल्यानंतर त्यांच्या रोजगारक्षमतेत वाढ करणे, हे या कार्यक्रमाचे उद्दिष्ट आहे. प्रत्येक शाखेच्या विद्यार्थ्यांसाठी सर्वसमावेशक कौशल्य आशयाची भर घातली जाऊ शकते, असे आम्हास वाटते.

महाविद्यालय आणि शेजारच्या प्रदेशातील हितसंबंधित व्यक्ती उद्योग आणि सामाजिक संस्था,यांच्याशी हितसंबंधित व्यक्ती याद्वारे अशा आशयाचा विकास संयुक्तपणे केला जाऊ शकतो. अशा आशयाच्या प्रदानतेसाठी साधन व्यक्ती ह्या नियमित किंवा उपांग विद्याशाखा तसेच बाहेरून चालविली जाणारी विद्याशाखा असू शकते.

### केंद्रक म्हणून महाविद्यालय

जरी महाविद्यालय स्वतः या प्रयोजनासाठी त्यांच्या सोयीसुविधा (वर्गखोल्या इत्यादी) उपलब्ध करून देत असले तरी आणि तसेच असा कार्यक्रम जेथे शक्य असेल तेथे खाजगी कौशल्याधारित शिक्षण

देणाऱ्यांना, करण्यासाठी उक्ता देता येत असला (आऊटसोर्सींग)तरी प्रत्येक तालुका/जिल्हा यामध्ये सामाईक सुविधा निर्माण करण्यासाठी मोबदला देण्यात यावा, ज्याचा वेळेच्या सहभागाच्या तत्त्वावर महाविद्यालयाद्वारे वापर केला जाऊ शकतो. वर्गांबरोबरच या सुविधांमध्ये क्षेत्राच्या गरजा आणि विद्यार्थ्यांची

**समिती, पदवीपूर्व विद्यार्थ्यांसाठी विद्यमान अभ्यासक्रमात आणखी भर म्हणून कौशल्याधारित विकास कार्यक्रमाची (कौशल्ये तसेच हार्ड कौशल्ये) शिफारस करते. त्याचबरोबर, अंतर्गत सुविधांचा विकास करण्यासाठी आणि उक्ते काम (आऊटसोर्सिंग) यासाठी, प्रत्येक तालुका/जिल्हा यामध्ये सामाईक सुविधा निर्माण करण्यासाठी मोबदला देण्यात यावा, ज्याचा वेळेच्या**

परस्परसापेक्ष शिस्त (कोअर डिसीप्लीन) यांशी संबंधित प्रात्यक्षिक कौशल्ये शिकवण्यासाठी हाऊस गॅझेट/ साधनसामग्रीही देता येईल. असे सुचविण्यात येते की, तालुका/जिल्हा यातील विकास कार्यक्रमांसाठीच्या खर्चातून विनिर्दिष्ट टक्केवारी, 'क्रय शक्ति तुल्यता' (पीपीपी) पद्धतीने उभारावयाच्या व चालवावयाच्या अशा सुविधांचा भांडवली खर्च भागविण्यासाठी राखून ठेवता येईल.

**सहभागाच्या तत्त्वावर महाविद्यालयाद्वारे वापर केला जाऊ शकतो. वर्गांबरोबरच या सुविधांमध्ये क्षेत्राच्या गरजा आणि विद्यार्थ्यांची परस्पर सापेक्ष शिस्त (कोअर डिसीप्लीन) यांशी संबंधित प्रात्यक्षिक कौशल्ये शिकवण्यासाठी हाऊस गॅझेट) साधनसामग्रीही देता येईल. असे सुचविण्यात येते की, तालुका/जिल्हा यातील विकास कार्यक्रमांसाठीच्या खर्चातून विनिर्दिष्ट टक्केवारी, 'क्रय शक्ति तुल्यता' (पीपीपी) पद्धतीने उभारावयाच्या व चालवावयाच्या अशा सुविधांचा भांडवली खर्च भागविण्यासाठी राखून ठेवता येईल.**

**नोकरी कौशल्याशी सांगड घालणे.**

विशेषतः शेजारच्या प्रदेशातील विकास कार्यक्रमांतर्गत निर्माण होऊ शकणाऱ्या अपेक्षित नवीन रोजगाराच्या गरजा यासह प्रदेशाच्या गरजा भागविण्यासाठी नोकरीससक्षम युवक निर्माण करणे, हे अशा सुविधांचे उद्दिष्ट असावे.

**बहुविध हितसंबंधित व्यक्तींचा व्यवस्थापन निकाय**

अशा सुविधांचे व्यवस्थापन, या प्रयोजनासाठी घटित केलेल्या निगमाकडे सोपवण्यात यावे. अशा निगमाच्या रचनेमध्ये, शासन नामनिर्देशिती, त्या क्षेत्रातील महाविद्यालये, उद्योग व सामाजिक संस्था यांचे प्रतिनिधी हे वगळून इतरांचा समावेश असावा. अशा निगमाचे अध्यक्षपद त्या क्षेत्रातील वरिष्ठ शिक्षणतज्ञाकडे असावे. अशा सुविधेचे दैनंदिन व्यवस्थापन हे, सीआयआय,

मराठा चेंबर ऑफ कॉमर्स, एफआयसीसीआय किंवा इतर असे निकाय यासारख्या व्यावसायिक उद्योग संघाकडून (असोसिएशनस्कडून) हाताळण्यात यावे.

**निधी उभारणे : उद्योग-शासकीय ऐक्यसंबंध व शासकीय प्रकल्प यांच्यात सांगड घालणे.**

अशा सुविधा सुरू करण्यासाठीचा कार्यचालन खर्च हा, उद्योग/विद्यार्थी फी/ प्रशिक्षणार्थींनी तयार केलेल्या उत्पादनांची विक्री इत्यादीतून मिळेल. जे उद्योग, त्यांच्या निकायाद्वारे सामाजिक जबाबदारीचा भाग म्हणून अशा खर्चाचा मोठा हिस्सा उचलतात, असे उद्योग विद्यार्थ्यांच्या बाजूने नोकरीसाठी उत्तमरीत्या सिद्ध होऊन, उद्योगांना स्वतः लाभ पोहचवण्याव्यतिरिक्त समाजाला आपले मौलिक अंशदान देतील. शासनाने तसेच उद्योगाने निधी पुरविलेल्या समाजाभिमुख /उद्योगाभिमुख प्रकल्पामध्ये देखील त्यांना अशा सुविधा असल्या पाहिजेत. असे प्रकल्प, अशा कार्यक्रमाची अंमलबजावणी करताना विद्यार्थ्यांना संबंधित कौशल्ये शिकण्याची आणि त्याचवेळी सुविधा निर्मितीच्या साधनांची भर घालण्याची मौल्यवान संधी देतात.

प्रोत्साहनपर उद्योग पाठिंब्यासाठी शासन यथोचित कर सवलती निर्माण करु शकते (३० ए, ८० जी नमूद केलेली होती) शासन, गरजेवर आधारित विनिर्दिष्ट प्रकरणांमध्ये आवर्ती पाठिंब्याचा विचारदेखील करते. उद्योग, विद्यार्थ्यांना, प्रशिक्षणाचा प्रारंभिक कालावधी संपल्यानंतर, त्यांच्या कामानुसार, त्याने दिलेल्या अंशदानाच्या मर्यादेत, अल्प विद्यावेतनदेखील प्रदान करतो.

प्रत्येक विद्याशाखेमध्ये व्यवहार्यपणे भर घालणे शक्य असेल तेव्हा, अशा समावेश केलेल्या व्यावसायिक अभ्यासक्रमाची ओळख करून देणे गरजेचे आहे. सुलभ कौशल्ये विकास हा बहुतांश प्रकरणांमध्ये महत्त्वपूर्ण मानला जातो. शासनाचे तसेच उद्योगांचे असे कितीतरी कार्यक्रम आहेत की जे, आयसीटीशी संबंधित कौशल्याबरोबरच विद्यार्थ्यांच्या सहभागावर आधारित आहेत. (उदाहरणार्थ आयसीटीमार्फत राष्ट्रीय शिक्षण अभियानाअंतर्गत संधी) या कार्यक्रमाचा एक

**प्रत्येक विद्याशाखेमध्ये व्यवहार्यपणे भर घालणे शक्य असेल तेव्हा अशा समावेश केलेल्या व्यावसायिक अभ्यासक्रमाची ओळख करून देणे गरजेचे आहे. विद्यापीठ, कौशल्य विकास कार्यक्रमासाठी विद्यार्थ्यांनी खर्च करावयाचा किमान वेळ आणि अपेक्षित**

| | |
|---|---|
| भाग म्हणून अतिरिक्त कौशल्य हे, शेजारच्या क्षेत्रातील विकासाशी संबंधित आधारसामग्री निर्मिती करण्याचे उद्दिष्ट असणारा सामाईक प्रक्रियेमध्ये सहभागी होण्यासाठीच्या कार्यकुशलतेबाबत असू शकेल. | **नैपुण्यतेचा स्तर याचा तपशील देईल. ही सुविधा देणारे /महाविद्यालय हे, विद्यार्थ्यांचे मूल्यमापन करतील आणि त्यांना प्रमाणपत्र देतील. पदवीसाठीची अर्हता प्राप्त होण्यापूर्वी याची पूर्तता करणे आवश्यक आहे अशी एक पूर्वावश्यकता असावी.** |

**कौशल्य निविष्टींची व्याख्या करणे आणि मापन करणे**

विद्यापीठ, अशा कौशल्य विकास कार्यक्रमासाठी विद्यार्थ्यांनी खर्च करावयाचा किमान वेळ आणि अपेक्षित नैपुण्यतेचा स्तर याचा तपशील देतील. पदवीसाठीची अर्हता प्राप्त होण्यापूर्वी याची पूर्तता करणे आवश्यक असेल. अशी ही एक पूर्वावश्यकता असावी. सामावून घ्यावयाच्या कौशल्य संचांची निश्चित व्याप्ती ही, स्थानिक व्यवस्थापन निगमाने ठरविण्याची गरज आहे. त्याचे ध्येय संबंधित नियोक्त्यांनी पर्याप्त मानलेल्या रोजगार क्षमतेच्या स्तरापर्यंत पोहचण्याचे असावे.

ही सुविधा देणारे /महाविद्यालय हे, विद्यार्थ्यांचे मूल्यमापनदेखील करतील आणि त्यांना प्रमाणपत्र देतील. हे मान्य करण्यात आले आहे की, निरनिराळया ठिकाणांच्या कौशल्याभिमुख प्रशिक्षणाचा स्तर वेगवेगळा असू शकतो. तथापि, स्थानिक हितसंबंधित व्यक्तींची आस्था तसेच वाढलेली रोजगारक्षमता, आवश्यक दर्जाच्या संबंधित कौशल्याबाबतच्या प्रक्रियेस प्रेरणा देईल. स्थानिक व्यवस्थापन निकायाने मूळ उद्देशाशी सुसंगत नवीन सुचणाऱ्या कल्पना व प्रस्ताव यात लवचिक असण्याची आणि जुळवून घेण्याची गरज आहे. विद्यार्थ्यांच्या बाजूने येथे मूल्यवर्धन क्षमता वाढविण्याच्या अखंड प्रक्रियेचे उद्दिष्ट असावे.

**दिशादर्शक उपक्रम म्हणून कौशल्य विकासास सहाय्यभूत करणे**

उच्च शिक्षणाशी संबंधित कायद्यामधील बदलाद्वारे, आवश्यकता वाटल्यास, अशी चौकट स्थापन करण्याची आणि कायदेशीर समर्थतता स्थापित करण्याच्या प्रक्रियेमधील संभाव्य व्यत्ययांची तपासणी करणे आवश्यक असेल.

**१३.० स्वायत्त परीक्षा मंडळ : मूल्यमापन प्रक्रिया व पद्धतीत सुधारणा**

परीक्षा व अन्य मूल्यमापन हे कोणत्याही शैक्षणिक पाठयेत्तर कार्यक्रमाचे महत्त्वाचे मूलतत्त्व आहे. आदर्श म्हणून प्रत्येक विद्यार्थ्यांचे विशिष्ट पाठयक्रम अभ्यासक्रमाचा एक भाग म्हणून त्याच्या /तिच्या शिक्षकाने परीक्षण करावे. शिक्षकांना परीक्षण करावयाच्या पद्धतीसाठी निवड स्वातंत्र्य राहील. आपण शक्य होईल तेवढ्या लवकर वा आदर्श स्थितीच्या जवळ जाण्यासाठी आटोकाट प्रयत्न करीत असताना (आणि चांगली कामगिरी करणाऱ्या संस्था कार्यक्रम यांना स्वायत्तता निर्माण करण्याच्या दिशेने नेण्याची प्रक्रिया), आपल्या येथील सर्व विद्यापीठांना विशेषतः पदवीपूर्व परीक्षेला मोठया संख्येने बसणाऱ्या विद्यार्थ्यांचा भार अधिक प्रमाणात असतो. अगोदर चर्चा केल्याप्रमाणे हा भार मूळंच्या कामापासून मोठ्याप्रमाणात झालेल्या विमनस्कतेच्या कारणांमुळे नेहमी पडत असतो त्यामुळे

**आदर्श म्हणून प्रत्येक विद्यार्थ्यांचे विशिष्ट पाठयक्रम अभ्यासक्रमाचे एक भाग म्हणून त्याच्या/तिच्या शिक्षकाने परीक्षण करावे. शिक्षकांना परिक्षण करावयाच्या पद्धतीसाठी निवड स्वातंत्र्य राहील. आपण मुख्यत्वेकरून वा आदर्श स्थितीकडे जाण्याचे आटोकाट प्रयत्न करीत असताना येथील सर्व विद्यापीठांना विशेषतः पदवीपूर्व परीक्षेला मोठया संख्येने बसणाऱ्या विद्यार्थ्यांचा भार अधिक प्रमाणात येतो. वा मूळच्या कामापासून मोठ्या प्रमाणात भार पडत असतो.त्यामुळे विद्यापीठ त्यामध्ये नेहमी व्यस्त राहते. त्यामुळे अशी विनंती करण्यात येते की, परीक्षा व्यवस्थापनाचा भार विद्यापीठाच्या स्वायत्त परीक्षा मंडळाकडे सोपविण्यात यावा अशा मंडळाने विद्यापीठाच्या अटींनुसार परीक्षा घ्याव्यात आणि विद्यापीठ व विद्यार्थ्यांना घेण्यात**

विद्यापीठ त्यामध्ये नेहमी व्यस्त राहते. त्यामुळे अशी विनंती करण्यात येते की, परीक्षा

**आलेल्या परीक्षांच्या निकालाचे औपचारिक लेखी पुरावा सादर करावा.**

व्यवस्थापनाचा भार विद्यापीठाच्या स्वायत्त परीक्षा मंडळाकडे सोपविण्यात याव्या. अशा मंडळाने विद्यापीठाच्या अटींनुसार परीक्षा घ्याव्यात आणि विद्यापीठ व विद्यार्थ्यांना घेण्यात आलेल्या परीक्षांच्या निकालाचा औपचारिक लेखी पुरावा सादर करावा. निर्णय व पदवीसाठी मान्यता देण्याचे काम विद्यापीठासाठी योग्यरीतीने हाताळणे चालू राहील. यासाठी मंडळांना आवश्यक ते सांविधिक दर्जाचे अधिकार मिळण्याची तरतूद करणे अत्यंत गरजेचे असून कर्मचारी वर्गाचे काम तपासणे तसेच त्यावर योग्य कार्यवाही करणे आवश्यक आहे.

स्वायत्त परीक्षा मूल्यमापन मंडळाच्या संरचनाविषयक मॉड्युलर पत आधारित कार्यपद्धतीला ज्यावेळी प्रश्नसंचांचा मोठया प्रमाणावर संग्रह करून केवळ अखिल भारतीय तंत्रशिक्षण (आयसीटी) पार्श्वभूमी उत्कृष्टरीतीने रेखाटणे करणे त्याचप्रमाणे पाठयक्रम अभ्यासक्रमासाठी असणारी इतर मूल्यमापन साधने ठरविणे शक्य होईल, तेव्हाच मान्यता देण्यात येईल. त्यावेळी असलेल्या पद्धतीप्रमाणे सुरुवातीपासून चालू असलेल्या स्थितीनुसार सुरळीतपणे कालबद्ध पध्दतीने कार्यपद्धती चालू ठेवण्यासाठी या दोन्ही रुपरेषा व संक्षिप्त मूल्यमापनाची कार्यपद्धती या दोन्हीही अंतर्गत /बाह्य मूल्यमापन पद्धती यांमध्ये विभागली जाईल. समर्पित निकायाने शक्ती प्रदान केलेल्या स्वायत्त मंडळाने सर्वस्व स्थापन करावे आणि सध्याच्या गरजांच्या आधारावर असलेल्या स्थितीनुसार समितीने शिफारस केलेल्या ज्ञान व विकासाचे जाळे आणि संबंधित सेवा यावर आधारित व्यापक स्वरूपाचे अखिल भारतीय तंत्रशिक्षण देण्याचे कार्य सुरू करावे.

स्वायत्त परीक्षा मंडळानी हिस्सा घेणे/बँकीग तसेच इतर परीक्षा प्रपत्र भरणे उदाहरणार्थ किमान अटी व शर्ती पूर्ण झाल्यानंतर विद्यार्थ्यांना त्यांच्या पसंतीनुसार ऑनलाईन परीक्षा प्रपत्र भरण्यास देणे सुकर ठरेल.

अशा स्वायत्त मंडळांनी पारदर्शक पध्दतीने विद्यार्थ्यांना त्यांच्या आवडीनुसार सुविधाजनक होईल अशा प्रकारे उच्च दर्जाच्या स्पर्धात्मक परीक्षा घेण्याचा मार्ग सुकर होईल अशा महाविद्यालयांना व शिक्षकवर्गाला दर्जावाढ द्यावी.

तसेच एक गोष्ट दृष्टिसमोर ठेवणे आवश्यक आहे की, परीक्षामंडळाकडून परीक्षा घेणाऱ्या परीक्षा मंडळांना पदवी घेण्यात स्वातंत्र्य व ती घेण्यासाठीच्या दर्जात एकरूपता आणण्यासाठी महाविद्यालयीन स्तरावर परीक्षा घेण्यात येते का, हे पहावे. पर्यवेक्षक/मार्गदर्शक आणि विशेष प्रकल्प हाताळण्याच्या बाबत किंवा विशेषतः पदवीपूर्व स्तरावर प्रबंधाचे मूल्यमापन करणे यामध्ये महत्त्वाचा अंतर्भाव असणे आवश्यक असून त्याला मान्यता देण्याची गरज आहे. बहुउद्देशीय शिस्तविषयक/विकासाभिमुख प्रकल्प, मूल्यमापन, विद्यार्थ्यांच्या शिस्तविषयक कृतिसंबंधित सखोलता व आकलन यावर त्याचप्रमाणे निर्धारित प्रश्न सोडविण्याचा प्रयत्न आणि त्याचा परिणाम /बहुउद्देशीय शिस्त याद्वारे आघात आणि/ किंवा रूपांतरणविषयक पद्धती यावर प्रकाश टाकण्यात यावा.

## १४.० विद्यापीठांमधील आपले श्रेष्ठत्त्व : शासनपद्धती, संशोधनात्मक व गुणवत्ता दर्जा

जागतिक स्तरावरील बँकेने जागतिक दर्जाच्या विद्यापीठाचे तीन महत्त्वाचे पैलू सांगितले आहेत. विद्यापीठे हे इतर भागांतून आलेल्या गुणवत्ताधारक विद्यार्थ्यांना आकर्षित करण्यासाठी चुंबकासारखे कार्य करते. काही विद्यापीठे अतिशय मोठया प्रमाणात वेगवेगळया कार्यसूच्यानुसार कार्यक्रम आयोजित करतात. शैक्षणिक दर्जा वाढवणे हेच यामागील मुख्य ध्येय असते. अशाप्रकारच्या सुधारणांकरिता आवश्यकतेनुसार बदलणारे नियमन आवश्यक असते, शिक्षणात पदोपदी होणारे नवीन बदल घडवण्यासाठी यांची मदत होते. या ध्येयांकडे जाण्यासाठी यशस्वी वाटचाल करणे हे आपले कर्तव्य आहे. असा बदल घडवून आणण्यासाठी योग्यप्रकारचे नियम तयार करण्याची आपणास गरज आहे.

**विद्याविषयक सूक्ष्मावलोकनावर आधारित केलेले व्यवस्थापन**

विद्यापीठअंतर्गत व बाहेर सूक्ष्मावलोकनाद्वारे तपासलेल्या सिद्ध झालेल्या मार्गाच्या अभिलेखांसह विद्यैकनिष्ठांच्या हाती विद्यापीठ सोपवणे हा यावरील उपाय आहे. निवडणूक कार्याऐवजी प्रौढ सूक्ष्मावलोकन (पीअर) प्रक्रिया प्रचलित असते. पहिले प्रकर्षाचे परिपोषण करते तर दुसरे समतलन करणारे असते, त्यापासून साधारण परिस्थिती निर्माण होते.आज विद्यापीठ संरचना बाह्यरुपाने अधिक घडत असून कदाचित कठोर नियमांवर आधारित प्रक्रियेच्या प्रेरणेतून कमी घडत आहे. अशा परिस्थितीखाली विद्याविषयक तर्कशास्त्र कधी कधी दुय्यम बनते. ही परिस्थिती सुधारण्यासाठी निवडणुका काढून टाकल्या पाहिजेत. आणखी कठोर संख्यात्मक व अत्यंत विनिर्दिष्ट शर्तीऐवजी नियमांनी तत्त्वे मांडली जावीत. व्यापक नियमांचे विश्वसनीय आकलन आणि महाविद्यालयांबाबत निर्णय घेणे, यांमधून उद्दिष्ट अंमलात आणले पाहिजे. स्वयं महाविद्यालयांच्या आस्थापना अशाच प्रक्रियांचे अनुसरण करू शकतात. ह्या महत्त्वाच्या सुधारणा घडवून आणण्यासाठी आपणास विद्यापीठाचे अधिनियम बदलण्याची गरज आहे.

**निवडणूक कार्याऐवजी प्रौढ सूक्ष्मावलोकन (पीअर) प्रक्रिया प्रचलित असते. पहिले प्रकर्षाचे परिपोषण करते तर दुसरे समतलन करणारे असते, त्यापासून साधारण परिस्थिती निर्माण होते.**

**स्वायत्ततेला निधींचा आधार**

विद्यापीठाची स्वायत्तता हा अन्य निर्णायक घटक आहे. विद्यापीठातील कुलगुरू त्याचप्रमाणे अन्य अधिकाऱ्यांच्या नेमणुकीच्या बाबतीत, निर्णय घेण्याची प्रक्रिया, सूक्ष्मलोकन करून व कर्यात्मक विचारांवर आधारित असावी विद्यार्थ्यांशी असलेले विद्याशाखांचे प्रमाण तांत्रिक पाठबळ देणारा कर्मचारीवर्ग, अध्यापक वर्ग केवळ विद्यर्थ्यांशी असलेले प्रयोगशाळा ग्रंथालये, अखिल भारतीय तंत्रशिक्षण (आय सी टी) तसेच इतर पायाभूत घटक आणि त्यांची निटनेटकेपणा वेगवेगळ्या स्तरांतील व वेगवेगळ्या शाखा इत्यादिंतील विद्यार्थ्यांचे प्रमाण यासरख्या मापदंडानुसार प्रमाणके निश्चित करण्यात यावीत विद्यापीठास या प्रकाराच्या पूर्वनिर्धारित प्रमाणकच्या आधारे निश्चित खर्चाचा अंदाज असावा आणि आवश्यकता व इतर खर्च हा लोकांसाठी करताना मापदंडानुसार त्याला पूर्णपणे स्वायत्तता असावी.

<u>**शासनामार्फत स्थूलमानाने हितसंबंधित व्यक्तींचा**</u>

विद्यापीठाच्या व्यवस्थापन मंडळात विद्याशाखा, संलग्न महाविद्यालये, शासन, उद्योग व संस्था मंडळ आणि उच्च दर्जासह विद्यापीठातील विदैकनिष्ठ यासह सर्व हितसंबंधित व्यक्तींनी प्रतिनिधित्व करावे / सल्ला देण्याचे काम करावे. अशा मंडळाने मानवी संसाधन विकास संशोधनातील श्रेष्ठत्व, तंत्रशाळा त्यातील पर्याय गुंतवणूक केलेल्या संस्था / उद्योग अभिसंकेत व रोजगार क्षमता इत्यादींच्या बाबत अपेक्षित स्वाधीन करण्यासारखी कामे यानुसार पुढील कार्यक्रम निश्चित करणे

विद्यापीठ आणि संस्था यामध्ये जवळीक निर्माण करण्यासाठी संस्थाच्या तसेच विद्यापीठांच्या कार्यक्रमांना मोठ्या प्रमाणात प्रतिसाद मिळण्याची आवश्यकता आहे. असे सूचित करण्यात येते की, सल्लागार मंडळाच्या जागी "संस्था भागीदारी परिषद" असे नाव असलेल्या सल्लागार मंडळाची पुनःस्थापना करण्यात यावी "संस्था भागीदारी परिषद" ही विद्यापीठ प्रणाली व संस्थांमधील विविध हितसंबंधीत व्यक्ती यांमधील एक दुवा असावी. सार्वजनिक विद्यापीठांसाठी कर देणाऱ्या लोकांच्या पैशांवर अवलंबून राहणे ही एक कठीण बाब आहे. नामनिर्देशित सदस्य विद्यापीठातील विविध गुतवणूकदार यांच्याद्वारे खरा अर्थ अभिप्रत होतो. कुलपति (राज्यपाल) हे परिषदेचे प्रमुख असतील आणि सोउलचे संपूर्ण सदस्यत्व हे, कुलगुरूने सूचविलेल्या नावामधून कुलपतीने नामनिर्देशित केलेल्या वेगवेगळ्या क्षेत्रात काम करीत असलेल्या हितसंबंधित व्यक्तींचे प्रनिनिधीत्व करतील.

<u>**मॉड्यूलर क्रेडिट: मोहिमे अंतर्गत विद्यापीठ पाठ्यक्रम व सहकार्य**</u>

विद्यापीठाच्या विद्याविषयक मंडळाला राज्यातील विविध विद्यापीठातील एकरूपतेची सरंरचना मॉड्यूलर क्रेडिट तत्वावर विकसित करण्याची गरज आहे. पाठ्यक्रम निवडताना विद्यार्थ्यांच्या दृष्टिने पाहता पदवीच्या लवचिकपणासाठी संपूर्ण विद्यापिषयक कार्यक्रम विशेष योग्यतेवर आधारित असावा. जोपर्यंत ते जेथे ज्यांचे नाव नोंदलेले आहे त्या संस्थेत विशेष योग्यता यामध्ये विनिदिष्ट किमान अंक त्याने मिळविले आहेत त्याला पदवी संपादन करण्यासाठी आवश्यकतांची पूर्तता करून विशेष योग्यतांच्या हस्तांतरणसह अन्य संस्थाकडून प्रस्तृत केलेले पाठ्यक्रम निवडण्याचे स्वातंत्र असावे.

<u>शिक्षण गुणवक्ता चलनशीलता</u>

विद्याअभ्यासक व संशोधक याचीं चलनशीलता ही एक महत्वाची सहयोगाता व संबध्द संशोधन यासाठी भविष्यात महत्वपूर्ण ठरणार आहे. पार्श्विक नोदी (वयाची तमा न बाळगता) अपंग नियुक्या, भेटण्याची परिस्थिती इत्यादीबाबत तेथे फार मोठी लवचिकता असावी. विद्याभ्यासाची संलग्नता, उच्च परिणमकारक संशोधन फार मोठे प्रकल्प हाताळणे यानुसार बौध्दिक अभिकक्रमासारखे लाभ यांच्या परिणामी विस्तृत क्षमतेच्या आधारे व अनुवाद करण्याची फार मोठी क्षमता इतर भगातील संशोधनाची फालते याबाबतची माहिती अकलनीय नसते. महाराष्ट्र राज्यसमोर काही महत्वपूर्ण आव्हाने असताना विद्यापीठ एकत्रित काम करण्याच्या संदर्भात एसत्रीकरण याची जादा भर, फार महात्त्वपूर्ण आहे.

**विद्यापीठांना, राष्ट्रीय प्रयोग शाळेशी व उद्योग / संस्थाशी पर्यावरणाचे अध्ययन करण्याची धार्मिक भावना सधन करण्याच्या कार्यक्रमांसाठी विद्यापीठांच्या क्षेत्रामध्ये त्यांच्या प्रत्यक्ष उपस्थितीच्याद्वारे नातेसंबंध बळकट करण्यासाठी अधिकार देण्यात यावे अशी विद्यामानता ही विद्याविषयक केंद्राच्या संशोधन शाळा किंवा मोठ्या सहकार तत्वाकरीता प्रकल्पाच्या स्वरूपात असेल. अशा व्यवस्थेच्या लाभ कमाल मर्यादेपर्यंत वाढविण्यात विद्याअभ्यासक व संशोधक याची चलनशीलता हा एक महत्वाचा घटक आहे व त्यावर विशेष लक्ष द्यावे.**

एकत्रिकरणावर दृष्टिक्षेप

विद्यापीठे व विद्यशाखाबाबत संग्निध संशोधन संख्या यामध्ये एकत्रिकरण, व्यक्तिगत संस्थाच्या कार्यक्रमामध्ये सहभागी होणारे विद्यार्थी विद्याशाखा त्याचप्रमाणे संबंधित संस्था यांच्या संदर्भात उत्कृष्ट सुसंवाद साधण्यासाठी शिक्षण व संशोधन यांचे संयुक्त कार्यक्रम बसविणे अशी सहकार तत्वावर प्रयत्न करण्याऱ्यांची अनेक उदाहरणे येथे आहेत. लोकांच्या समावेशामुळेच अधिकतर प्रकरणांमध्ये यश प्राप्त झाले आहे. विद्यापीठ व संस्था यांच्यातील शेजार उपलब्ध असलेल्या स्त्रोतामधून असे इष्टतम लाभ आणि असे उपक्रम यात अधिक लवचिकता आणण्यासाठी आटेकोर प्रयत्न करील. समिती आपल्या विद्यमान संस्थाच्या कामाकरण्यासंबंधात जोरदारपणे शिफारस करण्याचा मत्त्वाचा प्रयत्न करील. बहुद्देशीय स्तरावर सन्निध दर्जाच्या संस्थाचा समावेश

आणि व्यापक स्वरूपाच्या सहभागाद्वारे त्यातील अनेकांना गौरवशाली भूतकाळ लाभला आहे, शासन राज्यमधील काही मत्त्वाच्या उच्च शैक्षणिक व संशोधन संस्थासाठी पर्याप्त निधी उभारण्यासाठी विशेष प्रकल्प हाती घेईल. विद्यार्थ्यांच्या यथार्थ दर्शनातून ते विद्यापीठात असतील तेव्हा त्याबारोबर त्यानंतरच्या व्यावसायिक जिविकासाठी जादा संधी निर्माण करण्याची व्यवस्था करील

**<u>विद्यापीठ: सर्वांगीण , प्रायोगिक, सामाजिक विकास</u>**

विद्यापीठ, त्यांच्या विद्यापीठ क्षेत्रामध्ये पर्यावरणाचे अध्ययन करण्यासाठी सर्वांगीण भावना निर्माण करण्यासाठी आटेकोट प्रयत्न करील. पर्यावरणातील तंत्रज्ञानामध्ये नवीन ज्ञानाच्या रूपांतरामुळे जागतिक दर्जाचे शैक्षणिक विद्यापीठ म्हणून मान्यता देण्यासाठी उच्च स्तरावर संशोधन कार्यक्रम असलेले ज्ञानाचे भांडार समोर ठेवील जेथे संस्था त्याचप्रमाणे उद्योग संस्था विकासामध्ये सहभागी असतील आणि समाजात अभियांत्रिकी कौशल्याचा प्रचार करण्याच्या पध्दतीच्या नवकल्पना परिपोषित करतील आणि उत्कृष्ट दर्जाच्या गुरूच्या मार्गदशेनाखाली शैक्षणिक प्रक्रियेद्वारे विद्यार्थ्यामधून उद्योजक शोधून काठणे फारच कठीण काम आहे.

असे पर्यावरणीय नेमून दिलेले काम प्रत्यक्षात आणणे फार कठीण काम आहे. तथापि आपन चौकटीत काम करण्याचे उद्दिष्ट ठेवून त्यामुळे प्रगतिशीलरितीने ऱ्हासकारक प्रवृत्तींचा हळूहळू शिरकाव होणार नाही आणखी आपल्याला अतिरिक्त विस्तार जसे (आय आटी मद्रास) संशोधन केंद्र, तंत्रशास्त्र उबवणयंत्र आणि वाणिज्यिक क्षेत्र विद्यापीठ संशोधनासाठी, भाषांतर करण्यासाठी कामात गुंतून राहण्यासाठी बांधील असेल. समाजिक प्रकल्पात बहुउदेशीय विद्याशाखा अंतर्भूत असतात आणि

त्याशाखंमधून अनेक विद्याशाखा राज्यापुढे काही महत्त्वाचे प्रश्न निर्माण करतात. शैक्षणिक पर्यावरणीय वातावरण इत्यादी समृध्द करण्यासाठी आणि शेजार यांच्यामध्ये बहुविद्य स्तरावर निश्चय झाला पाहिजे विद्यापीठ ज्यावेळी अशा उपाययोजनाद्वारे अनेकार्थी शैक्षणिक पध्दती समृध्द करते त्यावेळी महत्वची साधने निर्माण करता येतात आणि तसेच उच्चत्तर प्रस्तृतता संशोधन कार्यक्रममध्ये भाग घेण्यासाठी अंतर्गत अभिजाता गुणवर लक्ष्य कें्द्रित करतील.

विद्यापीठ त्याचबरोबर विद्यापीठाचे वेगवेगळे विभाग / कार्यक्रम यांचे आंरराष्ट्रीय सभासदांच्या बनलेल्या श्रेष्ठ असलेल्या गटाकडून नियतकालिक पुनर्विलोकन करण्याच्या अधीन भाग पाडण्यात येतील. परिणामी, अशा पुनविलोकन केलेल्या विद्यापीठाच्या व्यवस्थापन आणि विद्याविषयक संस्था यामध्ये चर्चा करण्यात त्यानंतर कार्यवाही करण्यासाठी त्याचा पाठपुरावा करणे आवश्यक आहे आणि सर्व हितसंबंधितांनी त्यात सहभागी झाले पाहिजे.

हे निर्विवादपणे महत्त्वाचे आहे की विद्यापिषयक तीव्रतेचे संक्रमण बळकट करण्यापेक्षा त्यात सौम्याता आणणे फारसे कठीण नाही आणि विद्यापिठाच्या विद्यविषयक दृष्टिविषयक गोष्टीवर प्रकाश टाकणे हेच आद्य कर्तत्त्व आहे.

**विकास : कौशल्यवर लक्ष्य केंद्रित करणे: सर्वासाठी वरवरचे मूल्य काढण्यासाठी मार्गदर्शक**

समितीची एक महत्त्वाची शिफारस आहे की, पदवीधर अभ्यासक्रमासाठी सौम्य व कठीण अशी दोन्हीही कौशल्य अर्थपूर्ण कौशल्य विकास आशय समाविष्ट करावा विद्यार्थ्यांमध्ये असलेले कौशल्या ओळखून त्यांच्या गरजा पूर्ण करण्यासाठी स्थानिक गरजा, प्रशिक्षण सुविधा उपलब्ध करणे, नवीन रोजगाराच्या संधी उपलब्ध करून न देण्याच्या गरजा लक्षात घेऊन त्यापध्दतीने विकेंद्रिकरण करण्यात येईल. विद्यापीठ मविद्यालयाशी संलग्न असतील तसेच अशा कौशल्य विकास कार्यक्रमांना फार माठा वाव आहे आणि अपेक्षित कार्यनिपुणतेच्या स्तरावार प्राप्त करण्यासाठी विद्यापीठ स्तरावर निरुपण करण्यात येईल. तसेच विद्यापीठ महाविद्यालयीन स्तरावर या कर्यक्रमावर अपले लक्ष केंद्रित करील आणि त्याला अधिस्विकृती देईल याप्रयोजनाकरिता विद्यापीठ, विद्याविषयक मंडळे उद्योग संस्था, शासकीय उच्च व इतर तज्ञ यांना सल्ला देण्याचा प्रयत्न करतील.

**आढावा: वास्तव तपासणी आणि नव्याने दृष्टिक्षेप.**

विद्यापीठ, त्याचप्रमाणे विद्यापीठाचे वेगवेगळे विभाग / विद्यापीठाचे कार्यक्रम, आंरराष्ट्रीय स्थायी सदस्यांनी बनलेल्या विख्यात गटाने नियतकलीक पुनर्विलोकन करण्याच्या अधीन असावेत. पुनर्विलोकनाच्या परिणामी विद्यापीठाच्या व्यवस्थापन आणि विद्याविषयक संस्था यामध्ये चर्चा करण्यात येईल त्यानंतर कार्यवाही करण्यासाठी त्यांचा पाठपुरावा करणे आवश्यक आहे. आणि त्यात सर्व हितसंबंधितांनी त्यात सहभागी झाले पाहिजे.

## १५.० शासन व विद्यापीठ यांच्यामध्ये दुवा साधणे :-

विद्यापीठांकरिता निरंतर आधार देणारी गुंतवणूक आणि निधी देणारे मॉडेल यांच्यामार्फत विकासाला चालना देण्यासाठी ज्ञानाचा वापर करणे.

या अगोदर म्हटल्याप्रमाणे, वाढत्या अर्थव्यवस्थेच्या गरजांशी संबंधित शिक्षणाद्वारे व कौशल्याद्वारे (व्यक्तींची संख्या व उच्च स्तरावरील त्यांची क्षमता या दोन्ही गोष्टींबाबत) मानवी भांडवलाचे कमालीकरण याचा आर्थिक वाढीचा वेग वाढवणे तसेच उद्योग व समाजातील व्यक्तीच्या कामाच्या दर्जामध्ये वाढ करणे या दोन्हीसाठी तातडीने आवश्यकता आहे. उच्च शिक्षणाच्या क्षेत्रातील सार्वजनिक गुंतवणुकीतील वाढीला अशाप्रकारे सर्वोच्च प्राधान्य दिले पाहिजे. किंबहुना अशा गुंतवणुका अधिकतम लाभांश देतील.

उच्च शिक्षण, शासनाने सुरू केलेल्या विकास कार्यांशी संलग्न करणे गरजेचे आहे.

उच्च शिक्षणाचा राज्याच्या विकास योजनांशी सांगड घालण्याची देखील गरज आहे. विद्यापीठे ही उत्कृष्ट तज्ञ मंडळे व बुद्धिमान कार्यदले आहेत व राज्यापुढील मोठया आव्हानांना सामोरे जाण्यास ती सक्षम असावीत. अशी आव्हाने, राज्यव्यापी सरावाचा

महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण व विकास आयोग (माहेड) स्थापन करण्याचे प्रस्तावित केले आहे. हा आयोग शासन व विद्यापीठ यांच्यामधील परस्परसौकर्याचे साधन असेल आणि तो पर्यवेक्षणाची कामे पार पाडील व विद्यापीठाचे कार्यक्रम आणि प्रादेशिक विकास यांच्यामधील दुवा असेल. महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण व विकास आयोगास एका बाजूने, राज्यपाल

भाग म्हणून विद्याशाखा, विद्यार्थी व समाज अंतर्भूत असलेल्या समन्वित संशोधन प्रयत्नांना महत्त्वपूर्ण संधी देऊ करते. अशी उदाहरणात्मक आव्हाने ही ग्रामीण उत्पन्न व ग्रामीण क्षेत्रांमधील संधी यांमध्ये वाढ करणे, स्वच्छ पिण्याचे पाणी, राज्यातील विविध क्षेत्रांमधील जास्तीत जास्त विकास-वाटा शोधून काढणे, अन्न व ऊर्जा यांची हमी देणे इत्यादी धोरणांमार्फत नागरीकृत क्षेत्रांतील स्थलांतरण उलट दिशेने करणे, अशी असू शकतील. आपल्या विद्यापीठांनी अशी प्रत्येक आव्हाने पेलणे म्हणजे, आपल्या उच्च शिक्षणाची व संशोधन स्थितीची लक्षणीय संपन्नता असल्याचे मानले जाईल. यासाठीच आपणास राज्यामध्ये, राज्य शासन व सार्वजनिक विद्यापीठ यंत्रणा यांच्यामध्ये संपर्क असणे गरजेचे आहे.

**महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण व विकास आयोग : विद्यापीठ यंत्रणा अग्रगण्य ठरण्यासाठी व तिचे नियमन करण्यासाठी प्रस्तावित संरचना.**

म्हणून, महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण व विकास आयोग स्थापन करण्याचे प्रस्तावित करण्यात आले आहे. या आयोगात प्रख्यात विद्याभ्यासी, शास्त्रज्ञ, तंत्रशास्त्रज्ञ, व्यवसाय व उद्योग यांतील तज्ञ व वित्तीय तज्ञ यांचा समावेश असेल. महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण व विकास आयोग हा यथोचित व पुरेशा स्वायत्ततेनिशी एक एकाकी स्वतंत्र कायदेशीर संस्था असेल. तिला राज्याकडून निधी प्राप्त होईल. राज्य शासनाकडून सार्वजनिक विद्यापीठांना निधी मिळवून देणारे आणि मानव सक्षमीकरण व विकास यांच्या समुद्दिष्टांची अंमलबजावणी करणारे याचे ते प्रवाही माध्यम होईल. या दृष्टीने, महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण व विकास आयोग हा शासन व विद्यापीठ यांच्यामधील परस्पर सौकर्याचे एक साधन असेल आणि तो पर्यवेक्षणाची कामे पार पाडील व विद्यापीठाचे कार्यक्रम व प्रादेशिक विकास यांच्यामधील दुवा असेल. कुलगुरु तसेच राज्यातील उच्च शिक्षणाच्या चौकटीस सहाय्यभूत म्हणून उभारावयाच्या इतर अन्य संस्थांच्या प्रमुखांच्या

अध्यक्ष असलेल्या शिखर सल्लागार नि पर्यवेक्षण समिती ने (ए ए एससी) मार्गदर्शन करावे आणि एका बाजूने राज्यपाल व दुसऱ्या बाजूने, व्यापक पायावर आधारित शैक्षणिक व विकासात्मक परिषद (एडीसी) तिच्या अध्यक्षस्थानी असतील.

नियुक्तीच्या संदर्भात महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण व विकास आयोग (माहेड) मध्यवर्ती भूमिका बजावेल. महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण व विकास आयोगास एका बाजूने राज्यपाल अध्यक्ष असलेल्या शिखर सल्लागार नि पर्यवेक्षण समिती ने (एएएससी) मार्गदर्शन करावे आणि दुसऱ्या बाजूने, व्यापक पायाधारित शैक्षणिक व विकास परिषदने (एडीसी) असलेल्या मार्गदर्शन करावे. महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण व विकास आयोग संस्था निर्माण करील आणि या विद्यापीठांना सहाय्य करण्यासाठी अन्य कार्यांचे संघटन करतील त्या संस्थांना खर्चाची रक्कम देण्यात येईल. यामध्ये ज्ञान व तत्संबंधित सेवा जाळयांची उभारणी करणे, गुणवत्ता आश्वासक व स्वीकृती, स्नातक पूर्व मूल्यांकन, व्यवसायाभिमूख अभ्यास व खुल्या साधनसंपत्तीशी निगडित सक्षमीकरण सेवा, यांचा अंतर्भाव आहे. ही कार्ये सुकर करण्यासाठी संस्थात्मक चौकट उभारण्याची गरज आहे. महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण व विकास आयोगाने या संस्थांवर देखरेख ठेवली पाहिजे व या संस्थांना आपापली कार्ये पार पाडण्यासाठी मार्गदर्शन केले पाहिजे. राज्यात, शैक्षणिक यंत्रणेच्या प्रभावी व्यवस्थापनाकरिता, आपल्या विद्यापीठांशी संबंधित विभिन्न कार्यांच्या व्यावसायिक व्यवस्थापनासाठी शैक्षणिक प्रशासकांचा संवर्ग विकसित करण्याची गरज आहे. आपल्या विद्यापीठांमध्ये विविध विद्यापीठीय प्रशासनिक कार्ये ज्यांच्याकडून पार पाडणे अपेक्षित आहे अशा कर्मचारीवर्गाला व अधिकाऱ्यांना प्रशिक्षण देण्यासाठी व उद्बोधन करण्यासाठी संस्था उभारण्यात याव्यात. अशा संस्थांनी, विद्यापीठाचे प्रशासकीय कर्मचारीवर्ग व अधिकारी यांच्याकरिता प्रारंभिक प्रशिक्षण त्याचप्रमाणे नियतकालिक उजळणी व आवर्धन प्रशिक्षण हे दोन्ही घ्यावे.

**विद्यापीठांकरिता निरंतर आधार देणारी गुंतवणूक आणि निधी देणाऱ्या व्यक्ती-संस्था.**

समितीची अशी खात्री पटली आहे की, सध्याच्या स्पर्धात्मक वैश्विक आर्थिक अभिवृत्तीच्या कारण युगात, त्या प्रक्रियेत ज्ञानाला मिळणारे वाढते महत्त्व, युवकांचे आणि उदयोन्मुख ए ३ (कोणीही, कोणत्याही वेळी व कुठेही) समाजाचे सक्षमीकरण करून त्याद्वारे आपला लोकसंख्ये

> आपल्या विद्यापीठांना शासनाकडून संपूर्ण वित्तीय पाठिंबा मिळावा म्हणून समिती आग्रहाने शिफारस करते. साधनस्त्रोत उभारण्याकरिता

भाग विधायक विकास प्रक्रियेकडे नेण्याची आवश्यकता यासाठी उच्च शिक्षणाच्या आपल्या दृष्टिकोनात तातडीने बदल करण्याची गरज आहे. सध्या ज्या गुंतवणुका होत आहेत त्यापेक्षा लक्षणीयरीत्या उच्च स्तरावरील प्राधान्य गुंतवणुकीची खात्री देणे पुरेसे महत्त्वाचे आहे. विद्यमान परिस्थितीत या क्षेत्रातील गुंतवणुका देखील अधिक लाभांश देतील. परंतु जर असे झाले नाही आणि आपल्या युवा मानवी भांडवलास जितकी गरज आहे त्यानुसार विधायक व अर्थपूर्ण अशा उपजिविकेच्या संधी देवून त्यांना सकारात्मकरीत्या मार्गी लावले नाही तर अतिशय गंभीर असे नकारात्मक परिणाम होण्याची देखील भीती आहे. नवीन विद्यापीठक्षेत्राला सुमारे २०० कोटी रुपये भांडवली खर्च येईल आणि त्यातील कार्यक्रम अखंडपणे चालू राहण्यासाठी सुमारे १५ कोटी रुपये इतका आवर्ती वार्षिक खर्च अर्थसंकल्पात अंतर्भूत असणे गरजेचे असेल. वेतनासाठीच्या अर्थसंकल्पाव्यतिरिक्त हा खर्च असेल. शासन ज्या संस्थाना खर्चाची रक्कम देते त्या संस्थांशी संबंधित खर्चाचे अन्य घटकही आहेत. आपल्या विद्यापीठांना व उच्च शिक्षण संस्थाना संपूर्ण वित्तीय पाठिंबा मिळावा म्हणून समिती अगदी आग्रहाने शिफारस करते. व उच्च शिक्षण संस्थांनी, संबंधित निधी देणाऱ्या अभिकरणांकडून स्पर्धात्मकरीतीने संशोधन व विकास (आर आणि डी) प्रकल्पांना निधी मिळावा म्हणून प्रयत्नांची पराकाष्ठा केली पाहिजे.

इतर गोष्टींबरोबरच नवीन मार्गांचा अभ्यास करण्यासाठी महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियमान्वये योग्य त्या अधिसूचनांद्वारे विद्यापीठांना विशेष नियोजन प्राधिकरणाचा दर्जा बहाल करणे प्रस्तावित करण्यात आले आहे. उच्च शिक्षण व त्याच्या विकासासाठी असलेल्या महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण व विकास आयोगाच्या देखरेखीखाली सुयोग्य तपासणी करून व योग्य समतोल साधून हे काम केल्यास कदाचित परदेशातील सर्वोत्तम विद्यापीठांच्या पातळीऐवढी येथील अध्ययन वातावरणाची ऊंची गाठता येईल.

साधनस्त्रोत उभारण्याकरिता नवीन मार्गांचा अभ्यास करण्यासाठी देखील असे करता येईल. या प्रयोजनार्थ पुढील गोष्टी विचारात घेता येतील :

**(१)** ज्या विद्यापीठ वसाहतींचे क्षेत्रफळ १०० एकराहून अधिक आहे अशा विद्यापीठ वसाहतींकरिता विद्यापीठाला विशेष नियोजन प्राधिकरणाचा दर्जा देता येईल. महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियमानुसार, विशेष नियोजन प्राधिकरणाची पुढील कार्ये आहेत :-

(एक) भूमापन करून क्षेत्राचा जमीन- वापर नकाशा तयार करणे.

(दोन) क्षेत्राचा प्रारूप विकास आराखडा तयार करणे आणि शासनाच्या मान्यतेसाठी (शैक्षणिक वातावरण संपन्न करण्यासाठी असा विकास करण्यात येतो आहे याची खात्री करून घेण्यासाठी, महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण व विकास आयोगाला शासनाच्या वतीने हे काम करण्यासाठी अधिकार प्रदान करण्यात यावेत.) आणि तसेच आवश्यकतेनुसार वेळोवेळी त्यात केलेल्या फेरबदलांसह सादर कराने.

(तीन) अधिसूचित क्षेत्रामध्ये जमिनीचा वापर आणि ज्या रीतीने विकास केला ती रीत यांचे नियमन व नियंत्रण करण्यासाठी विकास नियंत्रण विनियम तयार करणे.

(चार) विशेष नियोजन प्राधिकरणाला अनधिकृत बांधकाम पाडण्याचे किंवा अतिक्रमण दूर करण्याचे अधिकार देखील असावेत.

वरील तरतुदी या विद्यापीठ क्षेत्राच्या/विद्यापीठ वसाहतीच्या कोणत्याही विकासासाठी, आंतरराष्ट्रीय मानकांच्या /प्रघातांच्या धर्तीवर चालणाऱ्या विद्यापीठांमधील सर्व नियोजनाकरिता व विकास कार्यक्रमांकरिता, राज्य शासन (महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण व विकास आयोग) वगळता अन्य कोणत्याही प्राधिकरणाच्या अडथळयाशिवाय कायदेशीर चौकट/पाठिंबा देणाऱ्या असल्यामुळे, अगदी आणीबाणीच्या आहेत. अशी विशेष प्राधिकरणे ही, महाराष्ट्रातील विशेष आर्थिक क्षेत्रांसाठी देखील तयार करण्यात आली आहेत आणि एकूणच विकास क्षमतांकरिता ती जणू उत्कृष्ट उदाहरणेच आहेत.

म्हणून, महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियमान्वये, योग्य त्या अधिसूचनांद्वारे विद्यापीठांना विशेष नियोजन प्राधिकरणाचा दर्जा बहाल करणे आवश्यक असेल.

अशा विद्यापीठ क्षेत्राच्या विकासाच्या प्रयत्नांचा एक भाग म्हणून समाजाच्या मोठ्या भागाला त्याचा लाभ मिळावा म्हणून विद्यापीठ क्षेत्रामध्ये विविध सुविधा पुरविण्यात याव्यात (आवश्यक असेल त्या ठिकाणी वेळेचे नियोजन करून त्या आधारे करता येईल). यामध्ये सर्वसामान्यांसाठी अल्पोपहारगृह, मनोरंजन व क्रीडा सुविधा, विश्लेषणात्मक प्रयोगशाळा, कौशल्य विकासाच्या सुविधा इत्यादी, समाविष्ट असतील. शिका व कमवा या संकल्पनेतील गरजू विद्यार्थ्यांसाठी अशा अवस्थांमुळे ही एक उत्तम सुसंधीच निर्माण होईल. अशाप्रकारे विद्यापीठक्षेत्रांमध्ये विकास घडवून आणताना, एखाद्याने व्यापारीकरण करताना दुष्कृत्यांना प्रतिबंध करून अध्ययन जागांचे पावित्र्य राखण्याचा सुरक्षित दृष्टिकोन ठेवण्याची गरज आहे. तथापि, उच्च शिक्षण व त्याच्या विकासासाठी असलेल्या महाराष्ट्र राज्य आयोगाच्या देखरेखीखाली सुयोग्य तपासणी करून व योग्य समतोल साधून हे काम केल्यास कदाचित परदेशातील सर्वोत्तम विद्यापीठांच्या पातळीशी येथील अध्ययन वातावरणाची ऊंची गाठता येईल.

> स्वायत्तता, हा विद्यापीठाच्या कार्यचालनातील देणगीदाराचा पाठिंबा वाढविणारा घटक आहे. विद्यापीठांनी त्यांच्या वित्तीय व्यवस्थापन पद्धतीचे, व्यावसायिक क्षमतांमध्ये वाढ करून, बळकटीकरण केले पाहिजे. विद्यापीठाला कोणत्याही स्वरूपात मिळणारा पाठिंबा उद्देशित हेतूंसाठी अगदी सत्कारणीच लावण्यात येईल असा आत्मविश्वास देणारा हवा.

(२) आणखी एका शक्यतेचा अभ्यास झाला पाहिजे आणि ती म्हणजे उच्च शिक्षणाच्या वित्तव्यवस्थेकरिता उपकर बसवणे ही होय. उच्च शिक्षणासाठी राखून ठेवलेल्या उपकराचा केवळ

उच्च शिक्षणाचा विस्तार व सुधार यासाठीच या पैशाचा उपयोग केला जात आहे ना याची खात्री केली पाहिजे.

(३) राज्य शासनास, विद्यापीठावर राज्य किंवा स्थानिक करांची अधिसूचित सूट देण्याचा बोजा तर नाही ना, याबाबत आधीच खात्री करता येईल. उदाहरणार्थ :

- अकृषिक निर्धारण व विद्यापीठाच्या धारण जमिनीवरील महसूल यातून सूट.
- विद्यापीठाबरोबर/विद्यापीठाकडून केला जाणारा कोणताही करार, भाडेपट्टा, विक्री यावरील मुद्रांक शुल्क आणि नोंदणी आकार यातून सूट.
- विद्यापीठाने स्वतःच्या वापरासाठी जनित्राद्वारे केलेल्या वीजनिर्मितीवरील विद्युत शुल्कातून सूट.
- ग्राम पंचायतीचा मालमत्ता कर व सुधार आकार यांसारख्या स्थानिक संस्था करांतून सूट.
- विद्यापीठ क्षेत्रातील इमारतींच्या बांधकामादरम्यान उत्खननात मिळालेल्या गौण खनिज (जमीन) यावरील प्रदेय स्वामित्वधनातून सूट.

(४) माजी विद्यार्थी, परोपकारी व्यक्ती, उद्योगधंदे व इतर लाभाधिकारी यांच्याकडून देणग्या व अन्य रूपात मिळालेले वित्तीय लाभ हे विद्यापीठांकरिता खर्च चालविण्याचा महत्त्वाचा स्त्रोत होऊ शकतो. वस्तुतः शासकीय चौकटीत राहून उत्तरोत्तर आणखी शक्य ती प्रगती करण्यासाठी विद्यापीठांकडे स्वतःचा विशेष असा मूळ निधी असला पाहिजे. विद्यार्थी कल्याण व समुपदेशन कार्यक्रम, विद्याशाखीय चालना कार्यक्रम, प्रायोगिक तत्त्वावरील नवीन उपक्रम विद्यापीठ क्षेत्र विकास नवोपक्रम, समाजाशी परस्पर सौकर्याचे संबंध, इत्यादी अशा काही कार्यक्रमांची उदाहरणे देता येतील. स्वायत्तता हा, विद्यापीठाच्या कार्यचालनातील अशाप्रकारे देणगीदारांच्या पाठिंब्याचे ठरीव प्रमाण निर्धारित करण्यातील एक महत्त्वाचा घटक आहे. अशा प्रकारच्या देणग्या या जास्तीत जास्त प्रमाणात करात लाभ देणाऱ्या असाव्यात.

(५) विद्यापीठांनी त्यांच्या वित्तीय व्यवस्थापन पद्धतीचे, त्या क्षेत्रातील व्यावसायिक क्षमतांमध्ये वाढ करून, बळकटीकरण केले पाहिजे. शासनाकडून केले जाणारे संनियंत्रण व लेखापरीक्षा याखेरीज विद्यार्थ्यांना त्यांना मिळणाऱ्या शिक्षणाचा खर्च कळला पाहिजे, देणगीदारांना ते करीत असलेल्या अंशदानाचा कशाप्रकारे उपयोग केला जातो आहे हे कळले पाहिजे आणि वस्तुतः विद्यापीठाला कोणत्याही स्वरूपात मिळणारा पाठिंबा उद्देशित हेतूंसाठी अगदी सत्कारणीच लावण्यात येईल असा त्यांना आत्मविश्वास असला पाहिजे.

**१६.० माहिती व संसूचना तंत्रज्ञान- सहाय्यभूत उच्च शिक्षण आराखडा.**

माहिती व संसूचना तंत्रज्ञानाने एकविसाव्या शतकातील उच्च शिक्षणात महत्त्वपूर्ण बदल घडून येईल असे दिसून येत आहे. याबाबतीतील विचार प्रवाह विचारात घेता, मनुष्यबळ विकास मंत्रालयाने (एम एच आर डी ) माहिती व संसूचना तंत्रज्ञानामार्फत राष्ट्रीय माहिती नेटवर्कचा यांत्रिकदृष्टया लाभ घेता येणारे असे एक राष्ट्रीय शिक्षण अभियान सुरू केले असून त्यामुळे भारतातील सर्व प्रमुख विद्यापीठे व महाविद्यालये एकमेकांशी जोडता येण्याची शक्यता आहे. याशिवाय, मोबाईल संदेशवहन क्षेत्रातील ३जी, ३.५जी आणि ४जी या जोडणीक्षमतेमुळे (कनेक्टीव्हीटी) एकंदरीत सूंपर्ण जोडणी क्षमतेतील (कनेक्टीव्हीटी) अडसर कायमचा दूर होणे अपेक्षित आहे. समिती शिफारस करते की, माहिती व संसूचना तंत्रज्ञान-सहाय्यभूत उच्च शिक्षण आराखडयाच्या अंमलबजावणीत महाराष्ट्र अग्रेसर असावे.

आपणास हे मान्य करावेच लागेल की, नवीन क्रियाशील ज्ञानाच्या प्रचालनाच्या प्रक्रियेमध्ये त्यातील पूरक भाग (इंट्रीगेशन), जतन (प्रिझर्व्हेशन), प्रसार आणि सर्वात महत्त्वाचे म्हणजे सामाजिक-आर्थिक परिवर्तनारिता त्याचे कल्पक उपयोजन हे प्रामुख्याने माहिती व दळणवळण तंत्रज्ञान-सहाय्यभूत किंवा माहिती व दळणवळण तंत्रज्ञान-चलित आहेत. चार मोठया बाबींमुळे इच्छित परिणाम होईल त्या म्हणजे, अंकीय स्वरूपात साठवण करणे. (डिजिटीलायाझेशन), प्रतिमा स्वरूपात साठवण करणे (व्हर्च्युलायझेशन), मोबायलायझेशन आणि पर्सनलायझेशन करणे. याबाबी गेल्या शतकात होत्या त्याप्रमाणे नाहीत. त्याखुपच सहयोगी, सह उत्पादक, सहभाग

घेणाऱ्या, स्वयं-दुरुस्ती करणाऱ्या, स्वयंसुधारणा आणि स्वयं-आयोजन करणाऱ्या, सीमारहित, जागतिक स्तरावर वितरण करणाऱ्या, समकालिक नसणाऱ्या, जलद, गतिशील, खुल्या आणि सर्वसमानता मानणाऱ्या आहेत.

सहज उपलब्ध होणारे ब्राऊझर, शक्तीशाली सर्च इंजिन व , असाधारण सोशल नेटवर्किंग साधने यांचे सहाय्य घेऊन इंटरनेटमुळे तयार झालेला समाज (socio-sphere) संपूर्ण जगभर पसरला आहे परंतु या सहजपणे संपर्क साधता न येणाऱ्या व्यक्तींकडून असाधारण सामूहिक कामगिरी आणि सामाजिक काम करणे शक्य झाले आहे. वस्तुतः शीघ्र समर्थ करणारे (लार्ज स्केल अनेबलर्स), गुणवत्ता वाढविणारे (क्वालिटी इन्हान्सर), कार्यक्षमता वर्धी (इफिशन्सिबूस्टर), खर्चिक नसणारे, (ईकानमाइझर),त्वरणित्र (अॅक्सेलरेटर), समकारी (ईक्वलाइझर) व मास-पर्सनलाइझर यांसारख्या माहिती व संसूचना, तंत्रज्ञानाच्या असामान्य शक्तीमुळेच सर्वसामान्य लोकांची असामान्य अशी कामगिरी शक्य झाली आहे.

**महाराष्ट्र राज्य हे, माहिती व संसूचना तंत्रज्ञान सहाय्यभूत उच्चशिक्षण आराखडयाची अंमलबजावणी करण्यात अग्रेसर असे राज्य असले पाहिजे. आमची अशी सूचना आहे की, सर्व विद्यापीठांमध्ये व्यापक माहिती व संसूचना तंत्रज्ञान विषयक पायाभूत सुविधा असलेले महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण माहिती व संसूचना नेटवर्क तयार करावे.**

या रूपांतरणीय पद्धती येत्या दशकात बिनतारी नेटवर्कद्वारे दळणवळण करणारे सर्वव्यापी व पसरलेले सेन्सर्स, नॅनो तंत्रज्ञानाचे उपयोजन (अॅप्लिकेशन),सर्वत्र उपलब्ध होणारे व परवडण्याजोगे लॅपटॉप व डेस्कटॉप यांमधील पीटा-फ्लॉप संस्करण पॉवर, जागतिक माहिती वेअर हाऊसेस, अतिवेगवान बॅन्डविडथ नेटवर्क आणि टेलिकॉम कंपन्यांकडून पुरविण्यात येणारी अंशतः योग्य परंतु प्रत्यक्ष वेळेवर देण्यात येणारी (रिअल टाइम) भाषा अनुवाद विषयक सेवा यासारख्या अमानवी बुद्धिमत्तेवर आधारित नवीन उपयोजने इ. सारख्या गोष्टी आल्यामुळे, जास्त वेगाने येण्याची शक्यता आहे. अशाप्रकारे, मानवी

सुधारणांचा, जागतिक बुद्धिमत्तेशी संयोग साधला जाईल आणि त्यांच्या समस्यांवर टिकून राहणारे, त्यातून विकास साधणारे व समर्थन करणारे असे माहितीवर आधारित उपाय वेगाने शोधून काढण्याचा प्रयत्न करण्यात येईल.

आपल्या २१ व्या शतकातील उच्च शिक्षणाला, ज्ञान निर्मिती, तिचे जतन व तिचा प्रसार व समस्यांची उकल करणे यासारख्या नवीन मुख्य प्रवाहातील बाबीपासून अलिप्त ठेवणे परवडण्यासारखे नाही. किंबहुना, आपल्या विद्यापीठांमधून आणि महाविद्यालयांमधून शिक्षण देण्याच्या कार्यपद्धतीतून या नवीन सामाजिक क्षेत्राचे जाणीवपूर्वक प्रबोधन केले गेले नाही तर आपल्या विद्यार्थ्यांकडे, सामान्यतः त्यांच्या जीवनातील आणि विशेषेकरून कामाच्या ठिकाणी त्यांची कर्तव्ये पूर्ण करण्यासाठी त्यांच्याकडे अपुरी सिद्धता राहील.

म्हणून, नव्याने उदयास येणाऱ्या डिजिटली जोडलेल्या समाजाच्या, २१ व्या शतकातील इंटरनेटमुळे तयार झालेल्या समाजाच्या (socio sphere) नवीन क्षमता, पद्धती, दृष्टिकोन, सामाजिक नेटवर्किंग साधने व मूल्यव्यवस्था ह्या बाबी, जेणेकरून ज्ञानाधारित अभिनव रूपांतरणाच्या सामाजिक सह निर्मितीसाठी एक प्रगत वशांततामय राष्ट्र घडवता येईल. भारतात उच्च शिक्षण देण्याच्या मुख्य प्रवाहातील एक उत्तम उदाहरण झाल्या पाहिजेत, म्हणून, उच्च शिक्षण पद्धतीस अत्याधुनिक माहिती तंत्रज्ञानाच्या पायाभूत सोयींद्वारे सक्षम करण्याची गरज आहे आणि उच्च शिक्षण देण्यासाठी ई-व्यासपीठ उभारण्याची आणि विविध हितसंबंधितामधील परस्पर प्रतिक्रिया जाणून घेण्याची आवश्यकता आहे.

उच्च व तंत्र शिक्षण मंत्रालयाने ई-अध्ययन आणि ई-प्रशासनिक सेवा या दोन्हींसाठी एक सर्व व्यापक डीजीटल विद्यापीठविषयक आराखडा तयार करण्याबाबत यापूर्वीच महाराष्ट्रातील विद्यापीठांना निदेश दिले आहेत. ई-अध्ययन आणि ई-प्रशासनिक सेवा देण्यासाठी बळकट, वृद्धिंगत होणाऱ्या व शक्तीशाली अशा तांत्रिक अंतर्गत यंत्रणा उपलब्ध करून देणे गरजेचे आहे. आवश्यक तांत्रिक सुविधा योग्य दृश्यता (व्हिझिबिलीटि) आणि ग्रहणशक्तीसाठी खालील विभागांमध्ये विभागता येईल.

- नेटवर्क कनेक्टीव्हिटी
- माहिती केंद्र (डाटा सेंटर)
- विद्यापीठ सर्व्हरची अंतर्गत रचना
- विद्यापीठ विभाग/महाविद्यालये/निर्धारणा/परीक्षा केंद्रे/शासकीय कार्यालये/उच्च शिक्षण सचिवालय, संचालनालय,सह संचालनालय/ विद्यापीठ अनुदान परीक्षा मंडळे/ सहायक अनुदान देणाऱ्या संस्थांची अंतर्गत रचना
- सुरक्षाविषयक पायाभूत सोयी

या पायाभूत सोयीमार्फत दिलेल्या माहिती तंत्रज्ञानाशी संबंधित सेवांचे वर्गीकरण पुढीलप्रमाणे करता येईल.

- व्हर्च्युअल क्लासरूम
- व्हॉइस ओव्हर इंटरनेट प्रोटोकॉल (व्हीओआयपी) विषयक पायाभूत सोयी
- वापरकर्त्यांची मदत आणि आधार (सपोर्ट) यंत्रणा
- संनियंत्रण व व्यवस्थापन यंत्रणा

नेटवर्क जोडणीत (कनेटिव्हिटी)स्थानिक क्षेत्र (लोकल एरिया) नेटवर्क आणि विस्तीर्ण क्षेत्र (वाइड ) नेटवर्क यांचा समावेश आहे.

ई-अध्ययन आणि ई-प्रशासनिक सेवा यांमध्ये प्रवेश करण्यासाठी विद्यार्थी, शिक्षक आणि कर्मचारी वर्गाकडून माहिती केंद्राशी जोडण्यासाठी वापरण्यात येईल अशा विविध नेटवर्किंग तंत्रज्ञानाच्या संयोगाची गरज आहे. प्रस्तावित डब्ल्युएएन (विस्तीर्ण क्षेत्र नेटवर्क) जोडणीमुळे (कनेक्टिव्हीटी) आवश्यक प्रवेश देता येईल आणि माहिती व संसूचना तंत्रज्ञानाद्वारे राष्ट्रीय शिक्षण अभियान याच्या मिशन डॉक्युमेंटमध्ये नमूद केलेल्या जोडणीनुसार (कनेक्टिव्हीटी) तंतोतंत जुळणारी आहे. तथापि, प्रात्यक्षिके, परस्पर प्रतिक्रिया, व्हाईस ओव्हर इंटरनेट प्रोटोकॉल इत्यादिंचा समावेश असलेली व्हिडिओ कॉन्फरसिंग, ई-अध्ययन सोल्यूशन यांसारख्या आजच्या बॅन्डविडथ

हंगरी ॲप्लिकेशनच्या संदर्भात जर हे नेटवर्क योग्य रीतीने आणि अधिक कार्यक्षमतेने वापरात आणायचे असेल तर त्या दस्तऐवजात नमूद केलेल्या बॅन्डविडथ् नेटवर्कच्या दर्जात (विद्यापीठासाठी १ जीबीपीएस ते १० जीबीपीएस पर्यंत आणि महाविद्यालये, इत्यादींसाठी १० एमबीपीएस ते १०० एमबीपीएसपर्यंत ) वाढ करण्याची गरज असेल.

प्रस्तावित विस्तीर्ण क्षेत्र नेटवर्क (डब्ल्यूएएन)जोडणीचा योग्य ग्रहणशक्तीकरिता (अन्डरस्टँन्डिंग) पुढील भागांमध्ये विभागणी करता येऊ शकते.

- विद्यापीठ क्षेत्र
- माहिती (डाटा) केंद्र
- संशोधन संघटना.
- महाविद्यालये/तंत्रनिकेतने/औद्योगिक प्रशिक्षण संस्था
- निर्धारणा / परीक्षा केंद्रे
- शाळा
- इंटरनेट जोडणी (कनेक्टिव्हीटी)
- नेटवर्क ऑपरेशन केंद्र (एन ओ सी)

ई-अध्ययन आणि ई-प्रशासनिक सेवा यांमध्ये प्रवेश करण्यासाठी, विद्यापीठ क्षेत्रामध्ये असलेला प्रत्येक विभाग, १ जीबीपीएस बॅन्डविडथ्चा विद्यापीठ क्षेत्राच्या (एलएएन)स्थानिक क्षेत्र नेटवर्कचा वापर करून एकमेकांशी जोडलेला असावा. तसेच विद्यापीठ, १जीबीपीएस बॅन्डविड्थचा (बॅकबोन) मुख्य प्रणाली असणाऱ्या राष्ट्रीय माहिती नेटवर्कशी जोडले पाहिजे. लवकरात लवकर महाराष्ट्रात राष्ट्रीय माहिती नेटवर्कचा शीघ्रतेने अधिकाधिक वापर करण्यासाठी राज्यशासनाच्या स्तरावरून विशेष प्रयत्न करण्यात आले आहे ही बाब अतिशय महत्त्वपूर्ण आहे. या जोडणीबरोबरच (कनेक्टिव्हीटी), १०० एमबीपीएस बॅन्डविडथचा एमपीएलएस-व्हीपीएन लिंक

असणारा बॅकअप देखील आवश्यक आहे. एका वेगळया आयएसपी पासून १०० एमबीपीएस लिंक असणारा बॅकअप घेतला पाहिजे, त्यामुळे फॉल्ट टॉलरन्स आणि रिडन्डन्सी मिळू शकेल.

प्रमाणशीर व शक्तीशाली सर्व्हर विषयक पायाभूत सोयींचा समूह असणारे माहिती केंद्र (डाटा) हे राज्य माहिती (डाटा) केंद्राचा एक भाग होऊ शकेल. माहिती केंद्रांचे तपशीलवार संकल्पचित्र पुढच्या भागात देण्यात आले आहे.

प्रत्येक महाविद्यालय/निर्धारणा /परीक्षा केंद्र/शासकीय कार्यालय/उच्च शिक्षण सचिवालय, संचालनालय, सहसंचालनालय/परीक्षा मंडळ / सहायक अनुदान संस्था या, १ एमबीपीएस बॅन्डविडथ्ची अतिरिक्त बॅकअप एमपीएलएस-व्हीपीएन लिंकसह १० एमबीपीएस बॅन्डविड्थ असणाऱ्या राष्ट्रीय माहिती नेटवर्कशी जोडण्यात यावेत. विद्यापीठाच्या जोडणीसाठी (कनेक्टिव्हीटी) विनिर्दिष्ट केल्याप्रमाणे एका वेगळ्या आयएसपी पासून बॅकअप-लिंक देखील मिळविण्यात यावी. प्रत्येक विद्यापीठ दोन इंटरनेट जोडण्यांनी, म्हणजेच १० एमबीपीएस (प्राथमिक) आणि ५ एमबीपीएस (दुय्यम) सह इंटरनेटशी जोडण्यात यावीत. प्रत्येक महाविद्यालय तंत्रनिकेतन/ औद्योगिक प्रशिक्षण संस्थादेखील ४ एमबीपीएस (प्राथमिक) आणि २ एमबीपीएस (दुय्यम) या भाडेपट्ट्यावर घेतलेल्या लाईनने इंटरनेटशी जोडता येऊ शकतील. यामुळे विद्यार्थ्यांना विविध ऑनलाईन प्रयोगशाळा, शैक्षणिक साहित्य आणि उद्योग यांच्याशी संपर्क साधणे शक्य होईल.

नेटवर्क ऑपरेशन केंद्र संपूर्ण माहिती तंत्रज्ञानाच्या पायाभूत सुविधांचे नेटवर्क संनियंत्रण करील आणि त्याची व्यवस्था ठेवेल. त्याच्या जोडणीत(कनेक्टिव्हीटी) माहिती तंत्रज्ञान पायाभूत सुविधांच्या अपटाईममध्ये खूपच गुंतागुंत असल्यामुळे, नेटवर्क ऑपरेशन केंद्र हे १०० एमबीपीएस बॅन्डविड्थच्या अतिरिक्त बॅकअप एमपीएलएस- व्हीपीएन लिंकसह १ जीबीपीएस बॅन्डविड्थचा बॅकअप असणाऱ्या राष्ट्रीय माहिती केंद्राशी जोडण्यात येईल. शक्तीशाली, बळकट, सुरक्षित आणि फॉल्ट टॉलरन्ट तांत्रिक पायाभूत सुविधा ह्या प्रमुख भाग (बॅकबोन) असतील, ज्याच्या आधारे महाराष्ट्रातील सर्व विद्यापीठांना विविध माहिती तंत्रज्ञानाच्या सहाय्यभूत सोयी, देता येऊ शकतील.

**माहितीविषयक सेवा**

या सेवेमुळे विद्यापीठाने स्वतः तयार केले आहे असे पोर्टल (वेबसाईट) यावरून सर्व विद्यार्थ्यांना सर्वसाधारण आणि व्यक्तीसापेक्षी माहिती उपलब्ध करून देणे सोयीचे ठरेल. या माहितीमध्ये  विद्यापीठ आणि त्याचे विभाग, अधिकारी, प्राधिकारी व विद्यापीठ समित्या, विद्यापीठाशी संलग्न महाविद्यालये / विद्यापीठ मान्यताप्राप्त संस्था आणि त्यांची अधिस्वीकृती  व मान्यताविषयक दर्जा; शैक्षणिकः विद्याशाखा, अभ्यासक्रम, पाठयक्रम इत्यादी प्रवेशः विविध अभ्यासक्रमांचे नियम आणि विनियम, शासनाच्या शिष्यवृत्त्या व सवलत आणि इतर योजना, शैक्षणिक कर्ज योजना, (विद्यापीठाला आणि त्याच्याद्वारे) मिळणारे पुरस्कार व सन्मान, बातम्या व समारंभ, परिपत्रके, शासन निर्णय, नोटीसा, अभ्यासानुसारी आणि अभ्यासेतर कार्यक्रम, स्पर्धा व पुरस्कार," ई ए एस वाय" (युवकासाठी सेवायोजन सहाय्य सेवा) नोकऱ्या, स्पर्धात्मक परीक्षा इत्यादी बाबी असतील.

**प्रशासनिक व सुविधा देणाऱ्या सेवा**

या सेवांमुळे विद्यार्थ्यांना वैयक्तिक प्रोफाईल अद्ययावत करणे; संस्करण करण्याची पात्रता, परीक्षेसाठी अर्ज करणे; परीक्षांचे पत्रक, वेळापत्रक, केंद्र व ठिकाण, परीक्षा हॉल तिकीट, गुणांचे ई-विवरणपत्र, पडताळणी व पुनर्मूल्यांकन, दीक्षांत समारंभ, स्थलांतरण प्रमाणपत्र, ई-प्रतिलेख, विविध अर्जांची स्थिती, प्रवेश ते दीक्षांत समारंभ, प्रवेश याबाबतचा प्रगतिशील अहवाल, अभ्यासक्रम, शिफारस केलेल्या पुस्तकांची सूची, संदर्भ, संपर्क कालावधीचे वेळापत्रक, पर्सनलाइज्ड अलर्ट्स नोटीसा, कॅलेंडर, प्लानर, ऑर्गनायझर, विद्यार्थी व शिक्षक यांना संदेश पाठविण्याची सेवा, संपर्क सेशन केंद्राची निवड, तक्रारींची नोंदणी व त्या दूर करणे याबाबतच्या सेवा उपलब्ध  करून देण्याच्या सुविधा मिळतील.

**अध्ययनविषयक सेवा**

अत्याधुनिक ई-अध्ययन तंत्रज्ञानाचा वापर करुन, या सेवा विद्यार्थ्यांसाठी एक तंत्रज्ञानविषयक विचार मांडणे, शिकाऊ स्वातंत्र्य केंद्रगत नवीन शिक्षण नमुना तयार करणे, उदा. ई-अध्ययनव्यवस्थापन पद्धती, ज्ञानव्यवस्थापन पद्धती विभाजित केलेला वर्ग, ऑनलाईन मूल्यांकन पद्धती, स्वाध्याय व्यवस्थापन पद्धती, प्रश्नावली आणि नमुना उत्तरे, प्रकल्प अहवाल, प्रकल्पविषयक नवीन कल्पना, व्यक्तिमत्त्व विकास, व्यावसायिक इंग्रजी, सहजसाध्य कौशल्य, आखणी केलेल्या चाचण्या (प्रोफाइलिंग टेस्ट), वेबकास्ट, व्हिडिओ व्याख्यानांचा ओघ (स्ट्रीमिंग) आणि पॉडकास्ट यांसारख्या सुविधा पुरविणे सुलभ होईल.

**सहभागी होता येईल आणि सहयोग देता येईल अशा सेवा**

या सेवांमुळे माहिती व दळणवळण तंत्रज्ञानाचा वापर करून "सहभाग" आणि "सहयोग" याद्वारे अध्ययन करण्याच्या योग्यतेचा शोध घेण्याचा प्रयत्न करता येतो, त्या म्हणजे विषयाशी संबंधित (Thematic) ई-समूह, चर्चा मंडळे, खेळांद्वारे अध्ययन, ब्लॉग्ज, विकी, जनमत, विचार व्यक्त करणे व विषयचर्चेत सहभागी होणे.

**१७.० सरकारी विद्यापीठांकरिता नवीन अधिनियम**

(समिती दोन विधानमंडळ आढावा आणि सरकारी विद्यापीठ पध्दतीच्या सुधारणा यांवरील संक्षिप्त भाष्य)

१. शिक्षणाच्या खाजगीकरणाकडे कल असतानाही सरकारी विद्यापीठे, येणाऱ्या शतकांसाठी, महाराष्ट्रातील लक्षावधी युवकांच्या भविष्याला आकार देण्याची महत्त्वाची भूमिका पार पाडीत आहे व ही भूमिका पार पाडणे सुरूच राहणार आहे. त्यांनी विधि प्रक्रियेमध्ये नवीन मार्गांचे प्रचालन, संशोधन व विकास संस्कृतीची जोपासना. २१ व्या शतकाच्या मूल्यांचा अवलंब करून धनवृद्धीसाठी ज्ञानाची तत्त्वे बिंबवणे आणि अध्यापन व संशोधन चौकटीमध्ये मोकळेपणा व लवचिकता आणणे यांनी संपन्न असण्याची गरज आहे. अशा विधिविषयक अंतररचनेसह त्यांना समृद्ध करणे गरजेचे आहे. विधी संरचनेमुळे विद्यार्थी व पालक, शिक्षक व शिक्षकेतर,निधी देणारी अभिकरणे व स्नातकांचे वापरकर्ते नियोक्ते आणि विविध स्तरांवर या प्रणालीचा एक

भाग असणारा समाज, अशा विविध लाभार्थींना प्रामाणिक उद्देश असणाऱ्या योग्य व्यक्ती ह्या विविध प्राधिकरणे व समित्यांमध्ये निर्णय प्रक्रियेत सहभागी होतात, याची खात्री करून घेण्याची गरज आहे. त्याशिवाय, या पद्धतीत अतिशय कार्याभिमुख पद्धतीने विविध तज्ञांना सहभागासाठी आकर्षित केले पाहिजे, जेणेकरून तिच्या (पद्धतीच्या) अंमलबजावणीमध्ये दर्जात्मक बदल घडवून आणता येतील. याखेरीज, शैक्षणिक संस्थांच्या सर्व घटकांमध्ये तंत्रज्ञानाचा सूज्ञ व नवीन पद्धतीने केलेला वापर हे भूतकाळाच्या जोखडामधून त्यांना स्वतंत्र करण्याचे आणि जागतिक संधींच्या आव्हानांना स्वीकारण्याचे एक हत्यार आहे.

२. भारतासारख्या कार्यतत्पर व उदयोन्मुख राष्ट्राकरिता "सुशिक्षित माहिती स्त्रोताचा निर्माता" म्हणून आपली ओळख जपताना ही सार्वजनिक प्रणाली सध्या खऱ्या अर्थाने कौशल्यपूर्ण कसरत करीत आहे. सार्वजनिक प्रणाली अनेक आव्हांनांना तोंड देत आहे; ही विद्यार्थ्यांची वाढती संख्या योग्य प्रकारे हाताळत आहे, हिला खूपच कमी वित्तीय सहाय्य मिळते आणि ही बदलत्या काळाशी पूर्णपणे विसंगत असणाऱ्या विधी चौकटीमध्ये राहून काम करत आहे. समिती दोनने या सर्व बाजूंचा सर्वंकष रीतीने विचार केला आहे. तिने, भारतीय विद्यापीठे ही उद्याच्या तरुणांच्या आशाआकांक्षा व अपेक्षा पूर्ण करणारी गतिशील व कार्यतत्पर बनविण्याकरिता महत्त्वाच्या अशा खालील बाजूंवर विचार करणारी अशी मुक्त, साधी व लवचिक विधिचौकट तयार केली आहे.

क) प्रादेशिक ओळखीचा आदर राखून समावेशकता

२१ व्या शतकाच्या आव्हांनाकरिता, युवकांच्या कल्पक मनांची योग्य वाढ व जोपासना करणे हे शिक्षणाचे अंगभूत वैशिष्ट्य आहे. महाजाल (इंटरनेट) हे ज्ञान मिळवण्याकरिता प्रबल असे सोईचे माध्यम होत असल्यामुळे-लोकांमध्ये माहितीचे आदानप्रदान करण्याकरिता वाहक म्हणून आणि जागतिक मंच अशा दोन्ही प्रकारे- आणि खरे म्हणजे विद्यार्थ्यांच्या नवीन पीढीला उच्च शिक्षणाच्या संपूर्णपणे वेगळया मॉडेलची गरज असल्यामुळे उच्च शिक्षणावरील विद्यापीठांची पकड सैल होत आहे. उच्च व व्यावसायिक शिक्षणाचे क्षेत्र विस्तारत आहे आणि राज्याच्या प्रगतीशील आर्थिक विकासाकरिता हे महत्त्वाचे आहे. कुटुंबांच्या मागण्या व आकांक्षा अशा आहेत की,त्या उत्पन्नाच्या व्यापक पटावर वाढतील व विस्तार पावतील, आणि उत्पन्नाच्या यथोचित कौशल्यासह संबंद्ध व दर्जात्मक शिक्षणाची विचारणा होईल. आजचा विद्यार्थी त्यांचे राहण्याचे ठिकाण कोठेही असले तरीही प्रवेश सुलभता आणि दळणवळण तंत्रज्ञानावर त्यांचे स्वत:चे असलेले प्रभुत्व यांमुळे तो स्वत: स्वयं-विद्यार्थी (सेल्फ लर्नर) बनला आहे. ज्ञान देणे हे विद्यापीठाचे काम त्यामुळे माहिती तंत्रज्ञानातील असाधारण अग्र ज्ञानाचा विद्यापीठांकरिता गर्भितार्थ वेगळा असेल. ज्या

मार्गाने आपण माहिती गोळा करतो, तिचा उपयोग करतो व ती पुढे पाठवतो तो मार्ग जलद गतीने विकसित होणाऱ्या तंत्रज्ञानामुळे नाट्यमयरीतीने बदलत आहे. त्यामुळे, जेथे ज्ञानाची निर्मिती करणे, त्याचे जतन करणे, ते इतरांना देणे आणि त्याचे उपयोजन करणे याबाबी अजूनही मोठ्या प्रमाणात पुस्तके, खडू-फळा, मौखिक व्याख्याने आणि स्थिर प्रतिमा यांवर आधारित आहेत अशा विद्यापीठाच्या पारंपरिक आदर्शालाच थेट आव्हान दिले गेले आहे. धोरणाच्या स्तरावर, विशेषत: एखादी व्यक्ती ज्या पद्धतीने उच्च शिक्षणाची पद्धती आणि धोरणाच्या उपयोजनाशी संबंधित कार्यतंत्र यांची हाताळणी करते त्या पद्धतीशी संबंधित स्तरावर, नवीन दृष्टिकोन असण्याची गरज आहे, जेणेकरून बदलत्या काळाचा विचार करून शैक्षणिक पायाभूतसुविधांच्या संबंधात महाराष्ट्रातील सर्व भाग विकसित होतील. म्हणून आम्ही महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण व विकास आयोग (माहेड) स्थापन करण्याचे प्रस्तावित करत आहोत. समुचित व योग्य स्वायत्ततेसह या आयोगाचे ते एकल स्वतंत्र वैध अस्तित्व असेल. या आयोगाला राज्याकडून निधी पुरवण्यात येईल. तो प्रख्यात विद्याभ्यासी, शास्त्रज्ञ, तंत्रसत्ताधीश, व्यवसाय/उद्योग तज्ञ व अर्थतज्ञ यांच्याद्वारे चालविण्यात येईल. हा आयोग म्हणजे राज्य शासनाद्वारे सरकारी विद्यापीठांना निधी देण्यासाठी एक दुवा असेल. विशिष्ट विद्यापीठांच्या शिफारशींवरुन महाविद्यालयांचा विस्तार करणे व निर्मिती करणे, त्यांचे शैक्षणिक कार्यक्रम यावर हा आयोग निर्णय घेईल व त्यांना परवानगी देईल. शिक्षक व कर्मचारी यांच्या तक्रारींचे तसेच प्रवेश व फी संरचनेशी संबंधित तक्रारींचे निवारण करण्याचे अधिकार आयोगाला असतील. महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण व विकास आयोग (माहेड) हा मनुष्यबळ विकास मंत्रालय व केंद्रातील शैक्षणिक धोरण ठरविण्याऱ्या व निर्णय घेणाऱ्या इतर विविध संस्था तसेच उच्च व व्यावसायिक शिक्षण क्षेत्रातील नियोजन आयोग यांच्याबरोबर राज्याचा दुवा असेल. अशाप्रकारे महाराष्ट्र राज्य उच्च व व्यावसायिक शिक्षण व विकास आयोग म्हणजे संपूर्ण राज्याकरिता नियोजन करणारी निधी धोरणावर कार्य करणारी, कामाची संरचना तयार करणारी आणि शैक्षणिक पद्धतीचा विकास व दर्जा यांचे संनियंत्रण करणारी एक प्रमुख संस्था असेल.

ख) जागेचे निर्बंध नसणारे दर्जात्मक शिक्षण

जागेचे निर्बंध नसणारे संबद्ध व दर्जात्मक शिक्षण मिळेल, याची खात्री करून देणे हे राज्यापुढील सर्वात मोठे आव्हान आहे. हे साध्य करण्याचा सर्वात योग्य तंत्रज्ञानाधारित उपाय म्हणजे माहितीचा ओघ असणारे नेटवर्क तयार करणे. आम्ही महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण माहिती सूचना नेटवर्क उभारण्याची शिफारस केली आहे हे कार्य महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण व विकास आयोगाला नेमून द्यावे. महाराष्ट्र

राज्य उच्च शिक्षण माहिती सूचना नेटवर्क हे राज्य नेटवर्क तयार केले की त्याने आंतरविद्यापीठ नेटवर्कचे काम पाहावे व तंत्रज्ञानातील बदल विचारात घेऊन नेटवर्कमध्ये दर्जावाढ करण्याकरिता धोरण ठरवावे. प्रत्येक विद्यापीठाने, स्वतःहून अंतर्गत माहिती नेटवर्कची व्यवस्था करावी.

माहिती व आधारसामग्रीच्या ओघाकरिता मार्ग तयार करणे ही महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण माहिती दळणवळण नेटवर्कची भूमिका आहे. हा मार्ग, समोरासमोर(एफ२एफ) बसून शिक्षण देण्याची पद्धती व ई-लर्निंग शिक्षण पद्धती या दोन्ही पद्धती एकत्रित करून त्याद्वारे वर्गात बसून अध्ययन करण्याच्या पद्धतीमध्ये दर्जावाढ करण्यासाठी अत्यंत महत्त्वाचा आहे. या जोडणीमुळे प्रत्यक्ष पद्धतीमार्फत विद्याशाखांमध्ये एकत्रितपणे सहभागी होणे, महाविद्यालये व विद्यापीठे यांच्यामधील ज्ञानाची साधने एकत्रितपणे विभागून घेणे सुलभ होईल, आणि राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय समन्वय निर्माण होईल. हे नेटवर्क महाविद्यालये, उप-विद्यालयक्षेत्रे, मुख्य विद्यापीठ क्षेत्रे यांमधील प्रशासकीय, आर्थिक , परीक्षा व शासन कार्यपद्धतींमध्ये अंतर व आंतर पद्धतीने कार्यक्षमता व विश्वासहिता यासाठी सहाय्यभूत ठरेल.

ग) एकसंधी जागतिक शैक्षणिकसंरचना

राज्यातील विद्यापीठे, आपापसात व राष्ट्रीय स्तरावर उच्च शिक्षण संस्थांमध्ये स्पर्धा करत असली तरी, अभ्यासक्रम व शिक्षण देण्याची पद्धती यातील जागतिक स्तरावरील सुधारणा विचारात घ्याव्या लागतील. २१ व्या शतकात, शिक्षणांचे आंतर् राष्ट्रीयकरण झाल्यामुळे प्रादेशिक, राष्ट्रीय व जागतिक स्तरावरील शिक्षणाकरिता सुलभ प्रवेश असावा, अशी मागणी आहे. ज्ञानाशी जोडलेल्या जागतिक अर्थव्यवस्थेच्या आव्हानांना सामोरे जाण्यासाठी विषय व विभाग यांच्या एकत्रिकरणाची (cross-fertilization) देखील मागणी आहे. पारंपरिक व मुक्त दूरस्थ अध्ययन यांच्यातील सीमा रेषा नाहीशा झाल्या आहेत आणि कौशल्य शिक्षण हे शिक्षणातील अविभाज्य घटक बनले आहे. वेळेचे बंधन नसलेला पाठ्यक्रमांचा मुक्त प्रवाह असून त्यामुळे विद्यार्थ्यांना बहुपैलू असणारे शिक्षण घेण्यास मुभा मिळेल. या तंत्रज्ञानामुळे वेगळया पद्धतीने शिक्षण देण्यासाठी नवीन दृष्टिकोन तयार होतील.

म्हणून आम्ही राज्यातील सर्व विद्यापीठांमध्ये, निवडीवर आधारित मॉड्युलर क्रेडीटवर आधारलेल्या पद्धतीची शिफारस केली आहे. आम्ही महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण व विकास आयोग (माहेड) निर्माण केला असून, हा आयोग एक शिखर छत्र संस्था असेल, ही इतर कामांबरोबरच, विद्यापीठ देऊ करत असलेल्या विविध पदव्यांकरिता विविध प्रतिष्ठेच्या केंद्रबिंदूंसाठी एकरूप आराखडा तयार करील. प्रत्येक विद्यापीठांनी विशिष्ट पदवी मिळवण्याकरिता विद्यार्थ्यांनी पूर्ण करावयाच्या

मॉड्युल्सची संख्या निश्चित करावी. आमच्या विद्यार्थ्यांना विविध राज्यांच्या विद्यापीठांमध्ये जाण्याची मुभा असेल, त्यांना कोणत्याही ठिकाणी वा कोणत्याही ठिकाणावरून, निवडीवर आधारित कॅफेटेरिया दृष्टिकोनाने सर्वोत्कृष्ट शिक्षण घेता येईल आणि त्यांना पुढील शिक्षणासाठी किंवा नोकरी करण्यासाठी जागतिक स्तरावर त्यांचा स्वीकार होईल.

घ) विकेंद्रीकरण, लहान ते सुंदर

उच्च शिक्षणासाठी प्रवेश मिळण्यात झालेली वाढ व समन्यायता, याचा संलग्न महाविद्यालयांच्या वाढीवर परिणाम झाला आहे आणि त्याचा विद्यापीठाच्या शैक्षणिक, प्रशासकीय, वित्तीय बाबींवर व विद्यापीठाच्या प्रशासनावर महत्त्वपूर्ण परिणाम झाला आहे. प्रत्येक राज्य विद्यापीठांना मोठ्या संख्येने महाविद्यालये संलग्न आहेत."शिक्षणाचा अधिकार" याचा परिणाम म्हणून येत्या दहा वर्षात त्यात निश्चित वाढ होणार आहे. राज्य विद्यमान विद्यापीठांचे विभाजन करून किंवा नवीन विद्यापीठांची निर्मिती करून अतिरिक्त विद्यापीठांची निर्मिती करू शकत नाही. यासाठी द्विस्तरीय दृष्टिकोन स्वीकारणे आवश्यक आहे. चांगल्या महाविद्यालयांना स्वायत्तता देणे,त्यांना मुख्य विद्यापीठांबरोबर पदवी प्रदान करण्याची जबाबदारी विभागून घेण्यासाठी त्यांना कायदेशीरपणे अधिकार प्रदान करणे व दुसरे म्हणजे तंत्रज्ञानाचा वापर करणे. आम्ही, विद्यापीठाच्या प्रत्येक जिल्हास्तरीय उपविद्यापीठ क्षेत्रामध्ये अधिकारी स्तरीय उपविद्यापीठ क्षेत्र संचालक निर्माण करण्याचे, माहिती अध्ययन करण्याच्या बाबींच्या ओघासाठी नेटवर्क असलेल्या महाविद्यालयांची निर्मिती करण्याचे आणि मुख्य व उप विद्यापीठ क्षेत्रांची निर्मिती करण्याचे आणि प्रशासन व शासन यंत्रणेकरिता माहिती व सूचना तंत्रज्ञान, एमआयएस यांचा वापर करण्याचे सूचित केले आहे. महाविद्यालयांमध्ये आत्मविश्वासाचे वातावरण निर्माण करून त्याद्वारे संलग्न महाविद्यालयांचा त्रास कमी करण्याकरिता निर्धारित व कालबद्ध प्रयत्न करावेत, असा आमचा प्रस्ताव आहे. आम्ही खालील अध्यापन पद्धतींची तीन स्तरांवर शिफारस करतो.

१. स्वायत्त महाविद्यालये

ज्या महाविद्यालयांना नॅक निर्धारणामध्ये २.५ पेक्षा अधिक सरासरी संचयी श्रेणी बिंदुसह अदर्जा किंवा बदर्जा (किंवा मान्यताप्राप्त निर्धारण व अधिस्वीकृती आभिकरणांकडून मिळालेला तत्सम दर्जा) मिळालेला आहे, ती महाविद्यालये , विद्यापीठाने स्वायत्त संस्था म्हणून घोषित करावीत. विद्यापीठ अशी सर्व प्रकरणे

आणखी वित्तीय सहाय्यासाठी विद्यापीठ अनुदान आयोगाकडे (युजीसी) पाठवेल. अदर्जा प्राप्त केलेल्या महाविद्यालयांची देखील "अध्यापनामधील श्रेष्ठत्वाकरिता संभवनीय महाविद्यालये " या अंतर्गत वित्तीय सहाय्याकरिता विचारात घेण्यासाठी विद्यापीठ अनुदान आयोगाकडे (युजीसीकडे) शिफारस करण्यात येईल.

२. अधिकार प्रदान केलेली स्वायत्त महाविद्यालये

संलग्न संरचनेचा भार कमी करण्यासाठी दोन विचारधारा आहेत. एक विचारधारा, मोठ्या विद्यापीठांचे अनेक प्रतिरूप विद्यापीठांमध्ये विभाजन करावे, असे म्हणणारी आहे आणि दुसरी अनेक अतिरिक्त विद्यापीठांची निर्मिती करण्याची शिफारस करते. (माहिती आयोगाने १५०० नवीन विद्यापीठांची निर्मिती करण्याची शिफारस केली आहे). हे दोन्ही दृष्टिकोन मोठ्या प्रमाणातील निधीच्या उपलब्धतेशी थेट संबंधित आहेत (व माहिती आयोगाने ३०,००० कोटी रुपयांच्या गुंतवणुकीची योजना तयार केली आहे) आणि एवढा निधी राज्य व केंद्र सरकार या दोन्हींच्या स्तरावर उपलब्ध नाही. दर्जा हा विद्यापीठांमधील शैक्षणिक व व्यवस्थापन यांकरिता योग्य वातावरण निर्माण करण्याशी जोडलेला आहे. काही नवीन विद्यापीठे निर्माण करणे हा केंद्र सरकारचा दृष्टिकोन म्हणजे योग्य दिशेने टाकलेले पाऊल आहे. याशिवाय दर्जा स्वयमेव व दर्जाचा टिकाऊपणा हा विद्यापीठांचे विभाजन किंवा नवीन विद्यापीठांची निर्मिती यांमुळे येणार नाही. आम्हाला असे वाटते की, चांगल्या दर्जाची महाविद्यालये किंवा महाविद्यालयांचा समूह निवडण्यासाठी अधिनियमातच कायदेशीर परंतुके निर्माण करणे आणि त्यांना पदवी (पदव्या) देण्यासाठी कायदेशीररीत्या "अधिकार प्रदान करणे" जास्त योग्य व कमी खर्चाचे आहे. यामुळे "अधिकार प्रदान केलेली स्वायत्त महाविद्यालये" व ते ज्याच्याशी संलग्न आहे ते "पालक विद्यापीठ" यांच्याकडून संयुक्त पदवी देण्यात येईल.

अधिकार प्रदान केलेली स्वायत्त समूह संस्था

असेही घडू शकते की, एखाद्या विशिष्ट संस्थेकडे चांगले कार्य करणाऱ्या महाविद्यालयांचा समूह आहे. अशा महाविद्यालय समूहांना "अधिकार प्रदान दर्जा" देता येऊ शकेल व अशी एकत्रित संस्था "अधिकार प्रदान केलेली स्वायत्त समूह संस्था" म्हणून निर्देशित करण्यात येईल.

ड.) नवोपक्रमासाठी स्वातंत्र्य

पदव्युत्तर स्तरावरील शिक्षणाला मग ते विद्यापीठांच्या विभागांमधील असो किंवा महाविद्यालयांमधील असो बळकटी आणणे ही आजची गरज आहे,

विद्यापीठांमध्ये संशोधन व विकास संस्कृतीमध्ये वाढ करणे व उपक्रम चालनाची इच्छा जोपासणे, नवीन कल्पनांचे पेटंट घेणे व बौद्धिक संपत्ती अधिकारांना पाठिंबा देणे आवश्यक आहे. प्रस्तावित अधिनियमाचा भाग असणाऱ्या 'विद्यापीठ विभाग व आंतरविद्याशाखीय अभ्यास समिती' आणि सुनिश्चित कार्यांसह महाविद्यालयातील 'पदव्युत्तर शिक्षण समिती' या दोन समित्यांनी अनुक्रमे मुख्य विद्यापीठ क्षेत्र व महाविद्यालये यांमध्ये अशी रचना शक्य करून दाखवावी.

विद्यापीठांतील अध्यापन व अध्ययन कार्यक्रमांचा दर्जा हा महाविद्यालये व विद्यापीठ क्षेत्रे यांमधील संशोधन व विकासासाठी आवश्यक असणारे वातावरण यावर मोठ्या प्रमाणावर अवलंबून आहे. संशोधन करणाऱ्या विद्यार्थ्यांना मुक्त वातावरणामध्ये त्यांचे काम करणे शक्य व्हावे म्हणून, आम्ही संशोधन व विकास याच्याशी संबंधित सर्व बाजूंचे संघटन व प्रशासन करण्यासाठी स्वतंत्र समितीची सूचना केली आहे. या समितीचे नाव "संशोधन व विकास समिती" कार्ड असे असून तिची कार्ये सुनिश्चित केली आहेत.

संशोधन व विकास कार्यक्रमातील मोठी आव्हानात्मक बाजू म्हणजे, महाविद्यालये व विद्यापीठ क्षेत्रामध्ये होत असलेल्या, संशोधनामधून उद्‌भवणाऱ्या माहितीच्या संबंधित (IP)चे संरक्षण करणे. जागरूकता निर्माण करण्यासाठी आणि पेटंट दाखल करण्यासाठी त्यांना मदत करण्याकरिता एकत्रितपणे काम करण्याचा दृष्टिकोन असणे विद्याशाखेकरिता आवश्यक आहे. संशोधन व विकास याच्या निष्पत्तीमध्ये व परिणामामध्ये उद्योगधंद्याच्या चांगल्या प्रस्ताव बनण्याचे सामर्थ्य आहे. अशा कल्पना प्रत्यक्षात उतरविणे व त्यांचे व्यवसायात रूपांतर करणे ही एक कला व विज्ञानही आहे. "नवोपक्रम, उद्‌भवन व उपक्रम मंडळ" या नावाचे नवीन प्राधिकरण आम्ही निर्माण केले असून त्याची उद्दिष्टे निश्चित केली आहेत आणि संशोधन व विकास संस्थांमधील तज्ज्ञांना , उद्योग व विद्यापीठ विभाग व महाविद्यालये यांतील संशोधन करणाऱ्या विद्यार्थ्यांना सदस्यत्व दिले आहे.

च) <u>तंत्रज्ञानाने सुसज्जित अध्ययन</u>

मागील शतकांमध्ये वर्गामध्ये देण्यात येणारे शिक्षण आणि विषय व ज्ञानशाखा यांच्या कामाचे जतन करणारी लिखित स्वरूपातील कामे यांचा संग्रह करून त्याद्वारे विद्यार्थी व शिक्षक यांच्यामधील परस्परसंवादाला सहाय्य करणे, हेच विद्यापीठाचे बौद्धिक केंद्रबिंदू आहेत. आजकाल अशा प्रकारचे ज्ञान अनेक स्वरूपात उपलब्ध आहे-पाठ्यपुस्तक, ग्राफिक्स,ध्वनि, अल्गॉरिथम आणि प्रत्यक्ष वास्तव सदृशीकरण- आणि ते जवळजवळ शब्दश: ईथरमध्ये अस्तित्वात आहे, ज्याचे वितरण डिजिटल स्वरूपात संपूर्ण जगभरातील नेटवर्कवर झाले असून ते कोणालाही उपलब्ध होऊ शकेल, आणि ते फक्त काही विद्वानां पुरतेच (academe) नाही तर सर्वसामान्यांना

देखील उपलब्ध आहे. अशा प्रकारे तंत्रज्ञानाच्या आधारे दिलेले शिक्षण, हाच शिक्षणाला उपयुक्त करण्याचा मंत्र आहे.

मागील काही दशकांमध्ये, संगणक हे शक्तिशाली माहिती यंत्रणेमध्ये विकसित झाले असून ते संपूर्ण जगभरामध्ये इतर यंत्रणांबरोबर वेगवान जोडणीद्वारे जोडले आहेत. संगणकाच्या संस्करण (प्रोसेसिंग) क्षमतेमध्ये सतत वाढ होत असली तरीही विद्यापीठांकरिता संपर्क तंत्रज्ञानाचा वेग अधिक वाढवणे ही जास्त महत्त्वाची गोष्ट आहे. विद्यापीठक्षेत्राबाहेरील साधनांसाठी इंटरनेट आणि विद्यार्थी, विद्याशाखा आणि कर्मचारी यांना एकत्रित जोडणारी "इंट्रानेट" क्षमता या दोन्ही गोष्टींना सर्वोच्च प्राथम्य आहे. डिजिटली मध्यस्थ समाज यांच्या रचनेकरिता आणि त्यांना सहाय्य करण्याकरिता आवश्यक असणारी जोडणी (कनेक्टिव्हिटी) हा मुख्य विषय असेल.

म्हणून आम्ही राज्य स्तरीय माहिती सूचना नेटवर्कच्या (महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण माहिती सूचना जाळे) निर्मितीचा पुरस्कार करतो. तथापि, अशा प्रकारची मूलभूत सुविधा निर्माण करणे हे आव्हान आहे. ऐतिहासिकदृष्ट्या, विद्यापींठाकरिता तंत्रज्ञान हे भांडवली खर्चासारखेच असल्याचे किंवा काही थोडयाच विद्यापीठांना उपलब्ध करून द्यावयाचे प्रायोगिक साधन असल्याचे दिसून आले आहे. भविष्यात उच्च शिक्षणाने माहिती तंत्रज्ञानाकडे गुंतवणूक म्हणून आणि महत्त्वाची मत्ता म्हणून अशा दोन्ही प्रकारे पाहिले पाहिजे, ज्याचा वापर सर्व विद्याशाखा, कर्मचारी आणि विद्यार्थी, विद्यापीठाचा उद्देश कायम राखण्यासाठी आणि त्यात वाढ करण्यासाठी करतील. उपभोक्त्यांच्या अपेक्षा ह्या नेहमीच वेगळ्या असतात, म्हणून त्या खूपच वेगवेगळ्या तंत्रज्ञानविषयक सुविधांची मागणी करतात. मानवविद्या या विषयाचे विद्यार्थी डिजिटल लायब्ररी व रेखाचित्रिय संस्करण (ग्राफिक प्रोसेसिंग) याकरिता सहज उपलब्ध होणाऱ्या नेटवर्कची मागणी करतील, तर विज्ञान व तंत्रज्ञानाचे विद्यार्थी समांतर संस्करणाची (पॅरलल प्रोसेसिंग) मागणी करतील. समाज विज्ञानाच्या विद्यार्थ्यांना व संशोधकांना मोठ्या प्रमाणातील माहिती भांडाराचे (डाटाबेस) व्यवस्थापन करण्याची क्षमता असणे आवडेल, उदा. डाटा वेअरहाऊस व डाटा मायनिंग टेक्नॉलॉजी प्रयोगनिष्ठ कला व वास्तुशास्त्राच्या विद्यार्थ्यांना मल्टिमिडिया तंत्रज्ञानाची आवश्यकता असेल. व्यापार व वित्तीय व्यवहारांसाठी जलद आधारसामग्री संस्करण (फास्ट डाटा प्रोसेसिंग), भक्कम संपर्क यंत्रणा, आणि अपवादात्मक उच्च दर्जाची सुरक्षितता आवश्यक असेल. संमिश्र बहुविध विक्रेते (व्हेन्डॉर) भिन्न साधनसामग्री, नानाविध संगणक प्रणाली (सॉफ्टवेअर) व कार्यप्रवर्तन यंत्रणा (ऑपरेटिंग सिस्टिम) वापरत असल्यामुळे या संमिश्र बहुविध विक्रेत्यांना एकत्र आणणे हे एक आव्हान असेल. या कारणास्तव, एकस्वाधिकार यंत्रणेवर अवलंबून राहण्यापेक्षा खुली यंत्रणा (ओपन सिस्टिम) तंत्रज्ञानाचा आग्रह धरणे महत्त्वाचे आहे. असे जटिल प्रश्न सोडवण्यासाठी, सु-शासित कार्यतंत्र म्हणून विद्याभ्यासी

(ॲकॅडेमिक्स), वित्तव्यवस्था व प्रशासन यातील तंत्रज्ञानाचे एकत्रीकरण करण्यासाठी आम्ही स्वतंत्र मंडळ स्थापन केले आहे.

## १८.०. उच्च शिक्षणाची रुपरेषा

(मोठ्या संलग्न विद्यापीठांच्या उप-विभागाच्या संबंधी समिती तीन चे संक्षिप्त भाष्य)

महाराष्ट्रात विद्यापीठांच्या उप-विभागासाठी नियुक्त केलेल्या समितीने उंचावत जाणारा उच्च शिक्षणाचा दर्जा व श्रेष्ठत्व यांकरिता , रोजगार संपत्ती निर्मितीसाठी शिक्षणाचा संबंध जोडण्यासाठी आणि सर्व विद्यार्थी / शिकाऊ व्यक्ती यांना समान व न्याय्य वागणूक मिळेल याची खात्री करण्यासाठी जागतिकीकरणाचा उपयोग करून घेण्याचा विचार केला आहे. प्रशासकीय संलग्न कार्याचा केंद्रीभूत परीक्षा व्यवस्थेवर पडणारा प्रचंड भार, मोठ्या संख्येने असलेले विद्यार्थी आणि विद्यापीठाला संलग्न असलेली महाविद्यालये यांचे मोठ्या प्रमाणावरील दडपण समितीच्या निदर्शनास आले आहे. ही महाविद्यालये चांगल्या सामाजिक उद्देशांनी सुरू केली आहेत. प्रादेशिक व सामाजिक विकासासाठी महाराष्ट्राच्या दुर्गम भागांचे आधुनिकीकरण करण्याचे साधन म्हणून महाविद्यालये सुरू करण्यात आली आहेत. सामाजिक राजकीय आणि आर्थिक विकासात्मक अपेक्षांमुळे दडपण आले आहे त्यामुळे विद्यापीठांमधील शैक्षणिक वातावरण गंभीररीत्या प्रदूषित झाले आहे, परिणामी, महाराष्ट्रातील उच्च शिक्षणाची व संशोधनाची गुणवत्ता व दर्जा खलावला आहे.

### १. **माहिती व संसूचना तंत्रज्ञानाशी निगडित समाजाशी संबंधित असलेल्या उच्च शिक्षणाची संपूर्णतः पुनर्रचना करणे आवश्यक आहे.**

विघातक नवीन शोध आणि माहिती व संसूचना तंत्रज्ञानाचे मोठया प्रमाणावरील बाजारीकरण उपकरणे-मोबाईल फोन, (टॅबलेट पीसी) लहान संगणक ब्रॉडबॅन्ड जोडणी, नेटवर्क सुलभ सेवा इत्यादींमुळे गेल्या एक-दोन दशकांमध्ये जागतिक सामाजिक चित्रामध्ये आमूलाग्र बदल होत आहे. कोणालाही ,कोठूनही, केव्हाही, (ए३जोडणी) जोडणाऱ्या जागतिक संपर्क यंत्रणेमुळे (ग्लोबल नेटवर्किंग) सर्वांना ज्ञानसाधने विभागून घेण्याची, संपर्क साधण्याची आणि प्रवेश देण्याची एक नवी कार्यपद्धती निर्माण झाली आहे. भारतही वनजी, टू जी आता थ्री जी (जी म्हणजे दळणवळण जोडणीची पीढी) या ब्राडबॅन्ड जोडणीचा उपयोग करून मोबाईल तंत्रज्ञानाद्वारे वेगाने जोडला जात आहे. जवळ जवळ ८७५ दशलक्ष इतक्या दूरध्वनी जोडण्या देण्यात आल्या असून त्यापैकी ८२७ दशलक्ष इतक्या जोडण्या मोबाईलच्या आहेत. ग्रामीण भागातही २८६ दशलक्ष इतक्या बिनतारी जोडण्या देण्यात आल्या

आहेत. संपर्क यंत्रणेने सुसज्ज असा समाज नव्याने उदयाला येत आहे आणि जनसंपर्काची साधने आणि तंत्र यामुळे ज्ञान संपदेचा मार्ग खुला झाल्याने आता त्याचा उच्च शिक्षण व्यवस्थेच्या आमूलाग्र पुनर्रचना करण्यासाठी वापर करता येईल. एकमेकांशी जोडलेल्या समाजाने त्याच्या जागतिक संपर्काद्वारे आणि ज्ञानाच्या खुल्या साधनांद्वारे आणि फेस बुक, ब्लॉग, विकीपीडिया इ. सारख्या सोशल नेटवर्किंग चळवळीद्वारे अनुभव वाटून घेण्याचे आणि अध्ययन व विकास यांकरिता विविध साधनांचा आणि तंत्रज्ञानाचा वापर करण्याचे नवनवीन मार्ग तयार केले आहेत. आता आतापर्यंत उच्च शिक्षणाची केंद्रे म्हणजे फक्त अध्ययन, सर्जनशीलता आणि विकास या माध्यमातून विद्यार्थ्यांना सक्षमीकरणासाठी उपलब्ध असलेली ठिकाणे होती. अध्ययन आणि विकासात्मक साधनसंपत्ती आता जागतिक स्तरावर महाजालावर (नेटवर्कवर) उपलब्ध झाली असून त्यामुळे अध्ययन, विकास आणि मूल्य निर्मितीचे पूर्णपणे वेगळेच चित्र निर्माण झाले आहे. एकमेंकांशी जोडलेल्या नव्या समाजाने स्व-अभिव्यक्तीचे अनेक मार्ग शोधून काढले आहेत. गेल्या काही वर्षांमध्ये स्व-संघटित शक्ती मोकळया झाल्या असून त्यांचे कार्य सुरू असल्याचे दिसून येत आहे. एकमेकांशी जोडले गेलेले लोक खुल्या साधनसंपत्तीमधून त्यांची निर्मितीक्षमता व उदारता यांचे सर्वोत्तम योगदान देत असून त्याचा संचय करीत आहे आणि सामाजिक संपत्ती/समाईक अधिकार निर्माण करत आहे. यामुळे आता अस्तित्वात असलेल्या शिक्षण पद्धतीकडे पुन्हा पाहण्याची गरज आहे. ही शिक्षण पद्धती अभ्यास व जीवनातील कामाचे तास वेगळे करते आणि त्यांचे रूपांतर अध्ययन, काम, विद्यार्जन, विकास आणि मूल्य व संपत्ती निर्माण याकडे बघण्याच्या समाकलित दृष्टीकोनामध्ये होते. नव्या शिक्षणामुळे प्रत्येक विद्यार्थ्याला, नव्याने जोडलेल्या समाजातील त्याचे/ तिचे भविष्य निर्माण करण्यास मदत झाली पाहिजे.

महाराष्ट्रातील उच्च शिक्षण: भविष्याची तयारी -नवनवीन योजना व वाटा.

### (छ) मूलभूत व कौशल्य शिक्षण यांच्यामधील सहकार्य वाढविणे

वाढते उद्योगधंदे हे, मूलभूत विषयांचा पाया भक्कम असणाऱ्या, व्यवसायाशी संबंधित कौशल्यांचा अनुभव असणाऱ्या आणि संवाद कौशल्याशी संबंधित संभाषणाचे अचूक (soft skill) ज्ञान असणाऱ्या, भाषेवर प्रभुत्व असणाऱ्या, उत्तम व्यक्तिमत्वाच्या व क्षमता उभारणी करणाऱ्या अशा पदवीधारकांच्या शोधात आहेत. गेल्या काही दशकांमध्ये निर्माण झालेले अत्यंत आल्हाददायक असे चित्र आपल्याकडे पाहायला मिळत आहे. सर्वसाधारण शिक्षण देणारी महाविद्यालये पदवीपूर्व विद्यार्थ्यांना कोणत्याही प्रकारचे कौशल्यविषयक शिक्षण न देता केवळ त्यांना शिक्षण देण्यातच गर्क आहेत. कौशल्यविषयक शिक्षण देणाऱ्या खाजगी संस्था विद्यमान कायदेशीर

रचनेबाहेर कौशल्यविषयक शिक्षण देत आहेत. औद्योगिक क्षेत्राने सुस्थापित करून ते स्वीकृतही केले आहे.

आम्ही कायद्याच्या चौकटीमध्ये राहून एकतर स्वतंत्र पद्धतीने किंवा महाविद्यालयांच्या परिसरामध्ये कौशल्यविषयक शिक्षण देणाऱ्या खाजगी संस्थांच्या सह-अस्तित्वासाठी आणि त्यांच्या सहयोगासाठी परस्परसंवाद साधून रूपरेषा तयार केली आहे. त्यानुसार आम्ही विद्यापीठ व्यवस्थेत "अधिकारप्रदत्त स्वायत्त व्यावसायिक कौशल्य विकास महाविद्यालये" निर्माण करण्याची शिफारस करत आहोत. ही महाविद्यालये, ज्या जागेत "सर्वसाधारण शिक्षण देणारी महाविद्यालये" चालविली जातात त्याच जागेत चालविली जातील. आवश्यकता भासल्यास शैक्षणिक, तांत्रिक किंवा भौतिक संरचनेची दर्जावाढ करण्यात येईल. ही महाविद्यालये विविध क्षेत्रांतील कौशल्य विकासामधील प्रमाणपत्र, पदविका आणि सहयोगी पदवी स्तरावरील कार्यक्रम राबवतील. यामुळे महाविद्यालयांना आपल्या मोकळ्या जागेचा आणि शैक्षणिक साधनसंपत्तीचा वापर वाढवता येईल आणि त्यांना, स्थानिक व प्रादेशिक उद्योगांबरोबर संवाद साधण्यातही मदत होईल. आम्ही विद्यमान शिक्षणपद्धतीद्वारे किंवा कौशल्यविषयक शिक्षण देणाऱ्या खाजगी संस्थांच्या सहकार्याने स्वतंत्र अशी अधिकारप्रदत्त स्वायत्त व्यावसायिक कौशल्य विकास महाविद्यालये निर्माण करण्याची शिफारस केली आहे. खरंतर, सर्वसाधारण शिक्षण देणाऱ्या संलग्न महाविद्यालयांच्या संयुक्त विद्यमाने "अधिकारप्रदत्त व्यावसायिक कौशल्य विकास महाविद्यालय" स्थापन करण्याकरिता कौशल्यविषयक शिक्षण देणाऱ्या खाजगी संस्थांचे स्वागतच आहे.

(ज) विद्यार्थ्यांचा सर्वांगीण विकास

नवे शतक हे सर्वंकष रीतीने युवकांची जडणघडण करील अशाच शिक्षणाच्या शोधात आहे. संस्कृतीचे कल्पनाचित्रण प्रयोगनिष्ठ कलांचे एकत्रीकरण आणि क्रीडा कौशल्य संपादन करणे यांमुळे युवकांना मानसिक, सामाजिक आणि शारीरिक स्वास्थ्य प्राप्त होईल. अधिक संवेदनशील आणि समाजाला जबाबदार असा माणूस घडविणाऱ्या या पैलूंचा प्रसार करण्यासाठी समाजातील योग्य तज्ञ सल्लागार असलेल्या दोन मंडळांची आम्ही शिफारस करतो. तसेच, विद्यापीठांमध्ये या उपक्रमांचे संनियंत्रण करण्याकरिता संचालक (विद्यार्थी कल्याण) आणि संचालक (क्रीडा) अशा पूर्ण वेळ व्यक्तींच्या स्वतंत्र कार्यालयांची निर्मिती करावी असेही आम्ही सुचवतो. विद्यार्थ्यांच्या सर्वांगीण विकासाचा अविभाज्य भाग म्हणून संस्कृती व क्रीडा याकरिता दोन स्वतंत्र मंडळांची आम्ही शिफारस केली आहे, ती म्हणजे संस्कृती व विद्यार्थी कल्याण मंडळ आणि क्रीडा मंडळ.

(झ) विद्यार्थीकेंद्रित कार्यक्षम प्रशासन

संपूर्ण विद्यापीठ व्यवस्थेने विद्यार्थ्यांवर लक्ष केंद्रित केले पाहिजे. विद्यापीठ व्यवस्थशी संबंधित असलेल्या इतर विविध व्यक्तीमध्ये एकीकडे शिक्षक, प्रशासकीय कर्मचारी वर्ग आणि इतर व्यक्ती (प्रामुख्याने शिक्षक व शिक्षण संस्था चालविणाऱ्या व्यक्ती) असतात तर, दुसरीकडे कुलगुरू, अधिष्ठाता आणि इतर वरिष्ठ अधिकारी असतात. सध्याचे विद्यापीठ अधिनियम हे, कार्ये, कर्तव्ये आणि अधिकार यांबाबतीत परस्परांना व्यापतात, त्यामुळे त्यांच्या विविध तरतुदींबाबत गोंधळ निर्माण होवून त्यांच्या गैरवापरास चालना मिळते.

जागतिकीकरणामुळे उद्‌भवलेल्या नवनव्या आव्हांनाना तोंड देण्यासाठी सर्व अधिकारीवर्ग व प्राधिकारी पुन्हा कामाला लागलेले आहेत. अधिष्ठात्यांची पदे पूर्ण वेळ अधिकारी म्हणून निर्माण केली आहेत. महाविद्यालयाचा मुख्य अधिकारी, अधिकारश्रेणीतील पुढचा वरिष्ठ अधिकारी हे पद निर्माण केले असून त्याच्याकडे ठराविक कामे नेमून दिली आहेत. महाविद्यालयाचा मुख्य अधिकारी आणि अधिष्ठाता हे पूर्ण वेळ अधिकारी असून त्यांची पाच वर्षांच्या कालावधीसाठी नियुक्ती असते. पूर्ण वेळ अधिकाऱ्यांकडून चालविले जाणारे आणि एक स्वायत्त संस्था म्हणूनही कार्य करणारे हे परीक्षा मंडळ परीक्षा प्रक्रियेमध्ये कार्यक्षमता आणि विश्वसनीयता आणू शकेल अभ्यास मंडळ, विद्याशाखा व विद्यापरिषद हे परीक्षांमध्ये सुधारणा घडवून आणू शकतील आणि महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण व विकास आयोग या सुधारणांच्या बाबतीत महत्त्वाची भूमिका बजावील. आमच्या प्रस्तावामुळे, लोकशाहीचा सन्मान करतांना आणि तिच्या फायद्यांचे लाभ घेतानाच विविध प्राधिकरणांवरील वेगवेगळ्या हितसंबंधित व्यक्तीची नेमणूक करण्याच्या संपूर्ण प्रक्रियेत खुलेपणा आणि पारदर्शकता येईल. विविध संस्थांमधील वेगवेगळ्या हितसंबंधित व्यक्तीच्या नेमणुकीच्या संपूर्ण प्रक्रियेत आम्ही योग्य ते बदल केले आहेत.

आम्ही शिफारस केलेल्या दोन प्रमुख सुधारणांपैकी एक म्हणजे अधिसभेची भूमिका पुन्हा निश्चित करणे आणि दुसरी म्हणजे व्यवस्थेबाहेरील तज्ञांचा मौलिक सल्ला मिळवण्याकरिता कुलगुरुला मदत करण्यासाठी सांविधिक समिती निर्माण करणे. अशा प्रकारच्या बदलांमुळे समाजाच्या गरजा आणि भविष्यात निर्माण होणाऱ्या अपेक्षा यांची नाळ विद्यार्थ्यांच्या महत्वाकाक्षांशी जोडली जाईल.

विविध हितसंबंधित व्यक्ती आणि विद्यापीठ प्राधिकरणे यांच्यामध्ये दुवा साधण्यासाठी विद्यापीठाची अधिसभा एक व्यासपीठ उपलब्ध करून देते. तिने कर्तव्यपालकाची भूमिका करावी आणि तिने विद्यापीठ प्राधिकरणांला तिचे कामकाज म्हणजेच विद्याविषयक संशोधन व विकास आणि प्रशासन सर्व दृष्टीने सुधारण्यासाठी त्यांना सूचना कराव्यात. म्हणून, आम्ही अशी शिफारस करतो की, अधिसभेला "संस्थ (सोसायटी) भागीदारी परिषद" (सोल) असे नाव देण्यात यावे. संस्था भागीदारी परिषद (सोल) म्हणजे विविध हितसंबंधित व्यक्तीचे चर्चापीठ असल्यामुळे

तसे खऱ्या अर्थाने प्रतिबिंबित झाले पाहिजे. हितसंबंधित व्यक्ती म्हणजे कर्मचारी/व्यापारी समूह, उद्योग, कृषी व कृषी-उत्पादनाधारित व्यवसाय, संशोधन व विकास अभिकरणे, सामाजिक सुधारणा करणाऱ्या संघटना, कला, साहित्य, संस्कृती व प्रयोगनिष्ठ कला सादर करण्याऱ्या संघटना, आरोग्य संघटना, महिला संघटना, पर्यावरणाशी आणि निसर्ग रक्षण संबंधित काम करणाऱ्या संघटना,सूचना व प्रसार माध्यमाशी संबंधित संघटना,वित्तीय व गुंतवणूक कार्याशी संबंधित संघटना, विधि सुधारणा व न्यायिक सेवेशी संबंधित संघटना, विद्यापीठाशी थेट निगडित नसलेल्या विद्याभ्यासी, ज्येष्ठ नागरिकांच्या संघटना, प्राथमिक, माध्यमिक आणि व्यावसायिक व सर्वसाधारण शिक्षणाशी संबंधित अशा संस्था व विश्वस्तमंडळे.

जागतिकीकरणातून उद्‌भवणाऱ्या आव्हानांच्या रेट्यामुळे अशी गरज निर्माण झाली आहे की, कुलगुरूला उच्च शिक्षणाच्या क्षेत्रातील जागतिक शिक्षणक्रमांची माहिती असणे अगत्याचे झाले आहे. त्याने /तिने विद्यापीठाच्या वाढीसाठी आणि विश्वसनियतेसाठी महत्त्वाच्या अशा विविध बाजूंचा विचार करण्यासाठी विविध क्षेत्रातील तज्ञ गटाकडून सल्ला घेण्याची शक्यता आजमावली पाहिजे. ही तज्ञ मंडळी स्वतंत्रपणे कार्य करणारी असावीत, आणि शक्यतो ती विद्यापीठ क्षेत्रातील विद्यमान उच्च शिक्षण संस्थांशी निगडित नसावीत. धोरण आखणे आणि विद्यापीठाला शैक्षणिकदृष्ट्या अधिक प्रभावशाली बनवण्यासाठी आणि प्रशासनिकदृष्ट्या खुली व कार्यक्षम आणि आर्थिकदृष्ट्या भक्कम अशी संस्था निर्माण करण्यासाठी संरचना अंमलात आणणे यांबाबत कुलगुरूला आणि त्याच्या /तिच्या मार्फत विविध प्राधिकाऱ्यांना आणि अधिकाऱ्यांना सल्ला देण्यासाठी विज्ञान व तंत्रज्ञान, मानवविद्या, अर्थशास्त्र व व्यवस्थापन, माहिती व संसूचना तंत्रज्ञान, मानवी साधनसंपत्ती व्यवस्थापन, वित्त व व्यवसाय/उद्योग या क्षेत्रांतील आठ नामांकित तज्ञ व्यक्तींची एक सांविधिक सल्लागार समिती स्थापन करावी अशी आमची सूचना आहे. हे सदस्य विद्यापीठाच्या कोणत्याही मंडळाशी निगडित नसावेत आणि सल्लागार समितीच्या त्यांच्या सदस्यत्वाचा कालावधी हा कुलगुरुच्या पदावधीइतकाच असावा. सांविधिक सल्लागार समिती, जागतिक स्तरावर सातत्याने बदलणाऱ्या शैक्षणिक रुपरेखेचे प्रतिबिंब व्यवस्थेत उतरेल अशा नवनवीन योजना तयार करण्यासाठी एक दुवा म्हणून काम करील.

(ज) <u>महाविद्यालये आणि विद्यापीठे यांची वित्तीय व्यवस्था भक्कम असणे.</u>

आम्ही तीन स्तरीय रचना सूचित करतो. पहिली म्हणजे, सर्वसाधारण पदवीचा खर्च काढण्यासाठी व्यावसायिक पदव्यांकरिता अवलंबण्यात येणाऱ्या फी निश्चिती कार्यपद्धतीचा वापर म्हणून, आम्ही नवीन अधिनियमाचा एक अविभाज्य भाग म्हणून फी निश्चिती समितीची शिफारस करतो. सरकारी महाविद्यालये व विद्यापीठे यांना सहायक अनुदान देण्यासाठी आम्ही एक नवा दृष्टीकोन विकसित करून तीन

स्तरीय (मॉडेल) आदर्श नमुना सुचविला आहे. पहिला स्तर हा सहायक अनुदान सूत्राचा एक नवा मार्ग उपलब्ध करून देतो. त्यात "फी समिती", शैक्षणिक व भौतिक पायाभूत सोयी सुविधांमधील गुंतवणुका, विद्याशाखा आणि सहाय्यकारी कर्मचारीवर्गाचा खर्च आणि प्रत्येक पदवीचा किंवा प्रत्येक विद्यार्थ्यांच्या अन्य कार्यक्रमांचा प्रशासकीय व इतर खर्च विचारात घेऊन "शिक्षणा" चा "वास्तविक" खर्च काढील आणि प्रत्येक वित्तीय वर्षाचे अनुदान निश्चित करण्यासाठी विविध कार्यक्रमातील सर्व विद्यार्थ्यांचा शिक्षणाचा खर्च काढण्यासाठी त्या खर्चाचा प्रति विद्यार्थी एकक म्हणून वापर करील. दुसरा स्तर हा, विद्यापीठाच्या क्षमतांचे साधनसंपत्तीच्या निर्मितीमध्ये रूपांतर करण्याचे विचारात घेता, प्रत्येक विद्यापीठाच्या चार वेगवेगळ्या मत्ता (परिसंपत्ती) असून त्या म्हणजे, मनुष्यबळ, बौद्धिक, सहसंबंध आणि नावलौकिक ह्या होत. मत्ता आणि आर्थिक व्यवहार यांचे एकीकरण (संयोग) (आर्थिक व्यवहारांसंबंधीची आव्हाने कार्यक्षमतेने पेलता येतील इतक्या मर्यादेपर्यंत), प्रत्येक विद्यापीठाच्या निश्चित धोरण रचनेतील संधीसंबंधीचे दिशानिदेशन यांमुळे स्वयंपोषक अशा शैक्षणिक व व्यावसायिक कार्यविभागाला आधार मिळतो. तिसरा स्तर म्हणजे उच्च व व्यवसायिक शिक्षण निधी महामंडळाने विद्यापीठाला सहाय्य देणे हा आहे. हे महामंडळ म्हणजे राज्याने सुरुवातीस रु.१००० कोटी इतक्या मर्यादेपर्यंत निधी मिळवून देण्यासाठी निर्माण केलेली एक स्वतंत्र संस्था असेल. नवीन कर्मचाऱ्यांच्या पहिल्या मासिक पगाराएवढा एक रकमी "व्यवसाय लाभ कर (पीएटी) " भरणाऱ्या प्रत्येक नियोक्त्याकडून उच्च व व्यावसायिक शिक्षण निधी महामंडळास महसुलाचा सतत ओघ सुरू असणे अपेक्षित आहे, त्याकरिता नियोक्त्याला करातून सूट मिळते, आणि प्रत्येक नवीन व्यावसायिक व सर्वसाधारण पदवीधर विद्यार्थी यांच्या कडूनवसूल करावयाची प्रवेश पातळीवरील परतावायोग्य ठेव अशा ठेवीची रक्कम ही त्या त्या पदवीनुसार कमी अधिक असेल आणि विद्यार्थ्यांनी पदवी संपादित केल्यानंतर त्यांना ती, परत करता येईल. उच्च व व्यावसायिक शिक्षण निधी महामंडळ शैक्षणिक व भौतिक संरचनेत वाढ करण्यासाठी विद्यार्थ्यांना आणि शिक्षण संस्थांना अल्पव्याजी कर्ज देण्याची तरतूद करील. विद्यार्थ्यांना असे कर्ज ३-५ टक्के दराने देता येईल व त्याची परतफेड ही त्यांना रोजगार मिळून उत्पन्न सुरू झाल्यानंतर करता येईल. १० वर्षे ते २५ वर्षे इतका मुदतमर्यादेमधून विद्यार्थ्याने कर्ज परतफेडीचा कालावधी निवडावयाचा आहे. उच्च शिक्षण संस्थांना देण्यात येणारी कर्जे ही, गहाणहमीसह कमी व्याज दराची (प्रस्तावाच्या गुणवत्तेवर आधारित वाणिज्यिक बँक कर्ज दराच्या सुमारे ७०टक्के इतके) आणि ५ ते १० वर्षे इतक्या परतफेडीच्या मुदतीची असतील.

(ट) जागतिकीकरण आणि राष्ट्रीयीकरण

राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरावरील शिखर शिक्षण व संशोधन संस्थां यांच्या संलग्नतेमुळे विद्यापीठ आणि महाविद्यालये यांच्यामधील अध्यापन व संशोधन कार्यक्रमांचा दर्जा वाढविण्यासाठी एक महत्त्वाचा मार्ग खुला झाला आहे. विदेशी विद्यार्थ्यांना आकर्षित करणे, तसेच राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय संस्थांमधील नामांकित संशोधन वैज्ञानिकांना सहायक प्राध्यापक होण्याकरिता आकर्षित करणे आणि संयुक्त संशोधन सहकार्याद्वारे अध्यापन व संशोधन कार्याकरिता उद्योग क्षेत्रातील तज्ञ व्यक्तींच्या कौशल्यपूर्ण ज्ञानाचा उपयोग करून घेण्यासाठी उद्योगक्षेत्राशी संबंध प्रस्थापित करणे आणि अनुभवी उद्योगतज्ञांना सहायक प्राध्यापकीच्या संधी उपलब्ध करून देणे या गोष्टी संघटित प्रयत्नांद्वारे साध्य करण्यासाठी विद्यापीठांनी विशेष प्रयत्न करण्याची गरज आहे. आता ह्या गोष्टी तंत्रज्ञानाच्या वापराद्वारे अत्यंत सुलभ झाल्या आहेत. महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण माहिती सूचनाजाळ्यामुळे असे दुवे अधिक सुलभ व प्रभावी बनतात. राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय दुवा समितीची अधिनियमाअंतर्गत निर्मिती करण्यात आली असून वर नमूद केलेली उद्दिष्टे तिची कार्ये सुनिश्चित करण्यात आली आहेत. राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय दुवा समितीने विदेशी विद्यार्थ्यांकरिता एक कक्ष स्थापन करण्यासाठी कार्यपद्धती देखील निश्चित करावी. प्रत्येक विद्यापीठ समृद्ध करण्यासाठी आंतरराष्ट्रीय (परदेशी) विद्यार्थी हे एक महत्त्वाचे साधन असून त्याला उत्तेजन देणे गरजेचे आहे.

(ठ) गुणवत्ता व सामाजिक लेखाजोखा

आमच्या व्यवस्थेतील उणिवांपैकी प्रमुख उणीव म्हणजे सर्वच स्तरांवरील उत्तरदायित्वाबद्दल असलेला पद्धतशीर निष्काळजीपणा. प्रत्येक प्रमुख हितसंबंधित व्यक्ती, शिक्षक, सहाय्यकारी कर्मचारी वर्ग, उच्च शिक्षण संस्थांचे व्यवस्थापक आणि विद्यार्थी हे जबाबदार आहेत. ह्या हितसंबंधित व्यक्तीच्या कामाचा दर्जा व कामे यांचे मूल्यमापन करण्यासाठी सुनिश्चित व नेमकी ठराविक कार्यपद्धती आणि पर्याप्त यंत्रणा असावी असे आम्ही प्रस्तावित करतो. अंतर्गत दर्जा आश्वासक कक्ष स्थापन करण्याचीही आमची सूचना असून हा कक्ष एक स्वतंत्र युनिट या नात्याने काम करील आणि विविध स्तरांवरील कार्यांवर "तिसरा डोळा " म्हणून लक्ष ठेवील जेणेकरून, संपूर्ण संस्थांमधील एकूण दर्जाची खात्री होईल. याबाबतच्या प्रक्रियेचे श्रेय हे उच्च शिक्षण संस्थांना दिले पाहिजे. अंतर्गत दर्जा आश्वासक सुधार कक्षाचे कार्य सुनिश्चित असून ते महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण व विकास आयोगाला जोडलेले आहे. अंतर्गत दर्जा आश्वासक कक्षाने विद्यापीठांतील अध्यापन, संशोधन व विकास आणि सामाजिक विकासाशी संबंधित इतर कार्ये यांच्या परिणामाचे निर्धारण देखील

केले पाहिजे, अशीही आमची इच्छा आहे. सर्वसामान्य समाजासाठी उच्च शिक्षण संस्थांनी केलेल्या कामगिरीच्या उपयुक्ततेच्या परिमाणाचा एक अतिरिक्त मापदंड म्हणून सामाजिक विकास परिणाम दर्शकाची आम्ही खरोखरच शिफारस करतो.

(ड) शिक्षण एक आजीवन अध्ययन प्रक्रिया

शिक्षण प्रक्रिया ही केवळ पदवी मिळवण्यापुरती सीमित नाही. तसेच, ती केवळ प्रौढ शिक्षण प्रक्रियेपुरतीदेखील मर्यादित नाही. शिक्षण ही एक आजीवन शिकण्याची प्रक्रिया असून याकरिता विद्यापीठांनी सहाय्यभूत कार्यतंत्र निर्माण करावे ही खरोखरीच काळाची गरज आहे. समाजाची सेवा म्हणून नवनवीन कार्यपद्धतींच्या निश्चित कार्यासह आणि आजीवन अध्ययनासाठी आणि आजीवन शिक्षणाच्या उपयोजनासाठी एका स्वतंत्र मंडळाची निर्मिती करावी असे आम्हाला वाटते आणि महाविद्यालये, विद्यापीठे येथे अशा उपक्रमांसाठी आणि अशा कार्यात गुंतलेल्या अशासकीय संघटनांना सहाय्य करण्यासाठी विशेष मनुष्य बळाची निर्मिती करणे ही सर्वात महत्त्वाची बाब आहे. लक्ष देणे आवश्यक आहे अशी आणखी एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे ज्येष्ठ नागरिकांसाठीच्या सहाय्यभूत सेवांचे विद्यार्थ्यांना प्रशिक्षण देणे. आमच्या देशातील लोकांचे आयुर्मान वाढेल असले तरी ज्येष्ठ नागरिकांचे प्रश्न सोडविण्यासाठी फारच कमी प्रमाणात प्रयत्न केले जातात. आम्ही एका स्वतंत्र आजीवन अध्ययन, मूल्य शिक्षण व जीवन कौशल्य विकास केंद्राची निर्मिती केली असून त्याबरोबरच आजीवन अध्ययन, मूल्य शिक्षण आणि जीवन कौशल्य विकास मंडळाचीही निर्मिती केली आहे.

आंतरजाल वापरणाऱ्या सोसासटीची (नेटवर्क सोसायटीची) नवीन कार्ये अंतर्भूत करण्यासाठी ज्ञानाचे उपयोजन (सामाजिक विकास आणि स्वायत्त स्वयंसंघटना व स्वयं-शासन ही दोन जास्तीची कार्ये विद्यापीठांच्या ज्ञानाची निर्मिती, जतन व प्रसार करणे या तीन पारंपारिक कार्या व्यतिरिक्त वाढविण्यात आली आहेत.

समितीने जागातिकीकरणामुळे हे बदल विचारात घेतले आहेत आणि विद्यापीठांचे उपविभाग काहीशा भिन्न मार्गाने काताळले आहेत आणि असे सुचविले आहे की ज्यामुळे विद्यापीठ शिक्षण देऊन विद्यार्थ्यांचे भविष्य घडविण्यासाठी शिक्षण संस्थांना स्वायत्तना घेऊन जबाबदारी पार पाडता येईल अशा महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण व विकास आयोगाचे एकछत्र पाठबळ याखाली स्वायत्त संस्था (विद्यापीठ क्षेत्रे व महाविद्यालये) निर्माण कराव्यात.

ए-३ संबंधित सोसायटीसाठी नवीन शिक्षण

आम्ही लहान स्वायत्त युनिटांना आपली स्वायत्ता पारिणाम कारकतेने कार्यक्षमतेने व जबाबदारीने वापरता येणे सहाय्यभूत ठरावे या करिता योग्य प्रकारे अंगीकारलेली उद्दिष्टे धोरणे साधने व सेवा याद्वारे मार्गदर्शन मिळालेल्या विद्यापीठ क्षेत्राच्या विकेंद्रित स्थानिक व स्वायत्त लहान युनिटांत व्यापक व केंद्रीकृत ताण असलेल्या विद्यापीठ शिक्षण पद्वतीची पुनर्रचना करण्याची शिफारस केली आहे: आजीवन अध्ययन एल ३ व स्वयं निदेशित विकास सुनिश्चित करण्यासाठी शिक्षण हे मूल्य व संपत्तीच्या निर्मितीसह सामाजिक विकासाशी जोडण्यात येत आहे. इको व्यवस्था अध्ययन माहराष्ट्र राज्य उच्च शिक्षण व विकास आयोगाद्वारे निर्माण करण्यात येईल आजित्याचा विस्तार, सर्व अध्ययनार्थी व शिक्षण सोवा पुरविणारे यासाठी एवच स्तरावरील शिक्षण क्षेत्र (लेव्हल ल्लेयींग फिल्ड) म्हणून इ. व्यासपीठ वापरून त्याच्या मदतीने सर्व अध्ययनार्थी व संस्था यांच्याकरिता सर्व महाराष्ट्रभर करण्यात येईल. खुली अध्ययन विचारसरणी पारंपारिक शिक्षणाशी (क्षमता विकास) प्रतिकात्मकरित्या मिळती जुळती आहे. विकिपिडीया निर्मित म्हणून सहसर्जनशीलतेसह क्षमता विकासाची भर पडली आहे. म्हणून आम्ही शिक्षणाचे नवे रूप व कार्ये तयार केली आणि त्याची शिफारस केली. त्याला नवीन शिक्षण असे संबोधले आहे ते समाज परिवर्तनाचे उद्दिष्ट ठेवलेल्या सामाजिक विकासात्मक अध्ययनयावर आधारित आहे.

३. शिक्षणची जागतिक-स्थानिक पध्दत

शिक्षणाची जागतिक-स्थानिक पध्दत ही महाराष्ट्र उच्च शिक्षण आयोगा पुरस्कृत असून केंद्रिंय स्थानिक पध्दत म्हणून विकासित झाली आहे. शिक्षणविषयक संघाना दोन स्तरावर आहेत:

केंद्रिय स्तर:- या स्तरात पुढील संस्था आहेत.

शिखर सल्लागार नि पर्यवेक्षी परिषद (ए ए एस सी)

महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण व विकास आयोग (एम ए एच ई डी)

शैक्षणिक विकास परिषद (ए डी सी)

या संस्था विद्यापीठांच्या स्वायत्ता कार्यास्त पांठिवा देण्यासाठी सामाईक धोरणे कार्यक्रम, साधने व सेवा निर्माण करण्यासाठी काम करताता.

स्थानिक स्तर :- यात

मुख्य विद्यापीठ व त्यांची स्वायत्त विद्यापीठ क्षेत्रे (प्रत्येक जिल्ह्यात एक) स्वायत्त महाविद्यालये व संलग्न महाविद्यालये.

अधिकार प्रदान केलेली स्वायत्त महाविद्यालये व अधिकार प्रदान केलेल्या स्वायत्त समूह संस्था महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण व विकास आयोगाअंतर्गत केंद्रिय संस्थांनी सर्वोत्कृष्ट कामगिरीसह कार्य करण्यासाठी आणि लहान व मोठ्या किंवा शहरी किंवा ग्रामीण संस्था पादर्शकता ठेऊन व जबाबदारीने काम करता येणे आणि महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण व विकास आयोगाअंतर्गत नेटवर्क सुविधा वापरून त्यांच्या विद्यार्थ्यांना दर्जेदार शिक्षण देता येणे शक्य व्हावे म्हणून आहे.

४. महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण व विकास आयोगाचे कार्य: राज्यासाठी इको: व्यवस्था व इ.व्यासपीठ अध्ययन निर्मिती करणे.

महाराष्ट्र राज्य आयोगाने उच्च शिक्षण व विकास आयोगाने आपल्या अधिपत्यासाखाली पुढील विभाग स्थापन केले आहेत.

अ) उच्च शिक्षण व विकास नेटवर्किंग व सेवा (एमएस-इडीयुएनईडी)

ब) गुणवत्ता व सर्वोत्कृष्ट आश्वासक आणि संलग्न परिषद (क्यूई परिषद)

क) पदवी पूर्व (यू जी) मूल्यमापन विभाग (यूजीई विभाग)

ड) खुली साधने व सक्षमीकरण सेवा (ओआरई सेवा)

ई) वितरित केंद्रांसह व्यावसायिक अभ्यासक्रम विभाग (व्हीएस विभाग)

या संस्था महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण व विकास आयोगाच्या संचालकांच्या नेतृत्त्वाखाली कामकाज पार पाडतील. अध्यायन व सामाजिक विकासाकरिता धोरणे साधने व सेवा याद्वारे अध्ययनार्थी व संस्था यांना उत्तेजन देणे आणि सर्जनशील व अभिनव कामांसाठी सुलभत्ता आणणे विद्यापीठांना (नेटवर्किंग) सुकर करणे ही विभागांची प्रमुख कार्ये असतील (एम एस ई डी यु एन ई टी) महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण व विकास व सेवा संपत्ती निर्माण करणारी नामात्रा संघटना या प्रमाणे सामाजिक विकासात्मक शिक्षण महामंडळ म्हणून स्थापन करता येऊ शकेल आणि इतर संस्था म्हणूजे परिषद पदवीपूर्व मूल्यमापन विभाग व वितरित केंद्रासह

व्यावसायिक अभ्यासक्रम विभाग या स्वायत्त संस्था म्हणून स्थापन करण्यात याव्यात अशी शिफारशी केली आहे. (कॉर्पोटेट) कामाच्या पध्दतीनुसार काम करावे आणि त्यांनी महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण विभागास दायी रहावे या संस्थांना प्राप्त होणारे (जेथे शक्य असेल तेथे) नफा महाराष्ट्रातील उच्च शिक्षण यंत्रणेच्या विकासासाठी खर्चा संबंधात आत्मनिर्भर राहता यावे म्हणून वापरण्यात यावा. निदान या यंत्रणेला विद्यापीठांच्या व महाविद्यालयांच्या कार्यात्यम

विभागांच्या प्रमुख कामांमध्ये ज्यामुळे विकेंद्रीकरण, स्वायत्त स्वयंशासित, जबाबदार पारदर्शी कार्ये यांस चालना मिळेल अशी अध्ययन इक्ये पध्दतीची निर्मिती , ब्रॉडबँड जोडणी व आत्यावश्यक सेवा आणि तंत्रज्ञान यांसह माहराष्ट्रतील सर्व उच्च शिक्षण घेणाऱ्या उध्ययनार्थीसाठी व्यासपीठ निर्माण करणे आणि सर्व विद्यार्थ्यांना ज्ञानाशी जोडलेल्या संबंधित आवश्यक असलेल्या इ.सेवा देणे ही कामे अंतर्भूत असतील. खुली साधने व सक्षमीकरण सेवा यामुळे सहकारी अध्ययन तसेच सांधिक कामकाजामार्फत सेवा आणि उत्पादन / विकास उध्ययन यास चालना मिळते आणि त्यातून सामाजिक संपत्ती व द्रव्यविषयक संपत्ती प्राप्त होऊन सह निर्मिती प्रक्रिया अस्तित्वात सर्व विभाग अशी साधने निर्माण करतील की ती अध्ययनार्थी समूहाच्या सामाजिक अर्थिक व सांस्कृतिक विकासासाठी उपयोगी ठरू शकतील आणि सामाजिक परिवर्तनात्मक शिक्षण पध्दतीत सहाय्यभूत ठरतील.

५. नवीन शिक्षण: आजीव अध्यपन प्रक्रियाम्हणून अध्ययन व विकास यांस जोणारा दुवा.

विद्यमान शिक्षण पध्दत ही केवळ अभ्यास विषयक पाठ्यक्रम शिकवणे आणि बहुंवशी आकलनीय स्वरूपाच्या ज्ञानावर व कौशल्यावर भर देणे यावर आधारलेली आहे. ज्ञान व कौशल्याच्या अनुषंगाने ही पध्दत विकसित झाली आहे परंतु, अखेरीस समाजाच्या विकासात भर घालेल अशा प्रकारे या शिक्षण पध्दतीने उपयोजन क्षेत्र किंवा जीवनविषयक प्रश्न याबाबतीत करण्याचे शिक्षण विद्यार्थ्यांना मिळालेली नाही. नवीन शिक्षण हे विस्तुत, व्यापक व जीवनाच्या टप्प्यांशी कामाशी व विकासाशी संबंधित आहे. ते विद्यार्थ्यांनी वैयक्तिकरित्या व गटाने हाती घ्यावयाचे स्वाध्याय व प्रकल्प या स्वरूपात काम करण्यावर अत्याधिक आधारित आहे. काही काम हे मामूहिक सहभाग प्रकारचे आहे. ज्ञान व विकास साधने प्रत्येककाला खुलेपणाने सहजसाध्य आहेत आणि ती सर्वव्यापी आहेत म्हणून सामूहिक सहभागाने काम करणे

अत्यावश्यक आहे. यातून आशय व शिक्षण केंद्रीभूत अध्यपनाचा अध्ययनार्थी व अध्ययनाभूत असा उल्लेखनीय व आदर्श बदल होतो

प्राथमिक शिक्षणापासून अंगीकारण्यात येत असलेलप विधायक दृष्टिकोन ठेऊन उच्च शिक्षणाची पुनर्रचना करण्याच्या दृष्टीने आम्ही असे प्रस्तावित करतो की, अभ्यासक्रमाविषयक ज्ञान व कौशल्य (स्वविकास) आधरित पारंपारिक अध्ययन आणि ज्ञानाचे उपयोजन, वृत्ती व मूल्ये आणि सामाजिक वर्तणूक आधारित विधायक कार्य केंद्रीत अध्ययन क्षमता विकास हे या पध्दती एकवटावयात. मोठ्या  गटाने काम करून आणि सहामूहिक सहभाग असलेले कार्यक्रम राबवून व त्यातून सामाजिक सामाईक / संपत्ती विकास साधणे हे परस्पर सहकार्य सह निर्मित अध्ययनाची तिसरी अध्ययन व विकासाची भूमिका आहे.

प्रत्येक विद्यार्थ्याला चार शखांतून निश्चित हस्तांतरणीय पॉईट देऊन पसंतीचा अभ्यासक्रम निवडण्याचे स्वतंत्र्य देण्यात आले आहे:

एक) विद्याविषयक शाखा

दोन) तंत्र विज्ञान शाखा

तीन) व्यावसायीन व सामाजिक शाखा

चार) व्याक्तिमत्व व सांस्कृतिक विकास शाखा

समोरासमोर आणि  /  किंवा इ.व्यासपीठ आणि ऑन लाईन (खुली अध्ययन शाखा) या प्रकारे अध्ययन करता येईल. पदवीसाठी विद्यापीठाने विहित केलेल्या  आवश्यकते नुसार विद्यार्थी वेगवेगाळ्या शाखांतून विविध मॉडयुलर पाठ्यक्रम अभ्यासू शकतात. जेणेकरून त्यांना पदावी प्राप्त घेने संपूर्ण स्वत्व आणि विविध मैलाचे दगड पार करून आणि जीवन अध्ययन व विकास यासाठी पथ निर्माण करणे हे उद्दिष्ट आहे. विद्यार्थींना त्याच्या  /  तिच्या वैयक्तिीक ध्येय विकसित करण्यासाठी व उपजिविकेसाठी अनेक पाठ्यक्रम निवडता येतील.

अभ्यासक्रम विषयक , अध्यापन-अध्ययन व कामागिरीचे मूल्यमापन यासांठीच्या सर्व आवश्यकता या एकच असून त्याम्हणजे समोरासमोर व पाठ्यक्रमांतून शाखा निवडणे या आहेत. यासाठी वैयक्तिक व गट संपर्क आवश्यकता या व्यतिरिक्त औपचारिक व अनौपचारिक पाठ्यक्रम प्रस्तुत करून त्याची विभिन्न वैशिष्टये ही मुलतः दूर केली आहेत. खुली अध्ययन शाखा व इतर शाखा पाठ्यक्रम यांच्यातील आवश्यकत तो भेद दूर करण्यासाठी शिकवणी व

समुपदेश हा एक मार्ग आहे. हा भेद वैयक्तिक व सामाजिक विकास ध्येयाच्या अनुषंगाने उपयोजन प्रक्रिया व उपयोजनाची ध्येये यामध्ये दुहेरी पध्दतीच्या विद्यापीठांसह खुली व पारंपारिक शिक्षण पध्दतीतील विधायक अध्ययनावर आधारित एकत्रिकरणच्या दृष्टिकोनाची आता आवश्यकता आहे.

विविध प्रयोजनांसाठी केडीट बॅकीग, इ-खाते, ओईआर वर आधारित शिक्षण पध्दती आणि वेगवेगळया वर्गखेल्यांतून समोरासमोर अध्यापन आवश्यक यंत्रणा आहे. आणि विद्यार्थ्यांना त्यांच्या पसंतीच्या पाठ्यक्रम देण्यासाठी प्रत्येक उच्च शिक्षण संस्थेच्या क्षेत्रात या सुविधा असल्याच पाहिजे.

६. उच्च शिक्षण संघटना: विकासात्मक उध्यापन पुनर्रचना

राज्यात उच्च शिक्षण तीन टप्प्यांमध्ये सुरू करण्यात आले आहे.

अ) पदव्यत्तर व संशोधन अभ्यासक्रम (पदव्युत्तर व संशोधन कार्यक्रमासह पदव्युत्तर विद्यापीठ क्षेत्रे व स्वायत्त महाविद्यालये)

ब) स्नातकपूर्व अभ्यासक्रम (विद्यापीठ क्षेत्रे, सार्वसाधारण व व्यावसायिक पदवी महाविद्यालये) आणि

क) मूलभूत अभ्यासक्रम व कौशल्य विकास (सलग्न सहयोगी व्यावसायिक महाविद्यालये / अधिकार प्रदान केलेली स्वायत्त व्यावसायिक कौशल्य विकास महाविद्यालये)

स्वायत्त व्यावसायिक महाविद्यालयानी व सहयोगी व्यावसायिक महाविद्यालयानी प्रत्येक विद्यार्थ्याला विद्या विषयक अभ्यासक्रमाच्या त्याच प्रमाणे ते रोजगारासाठी पात्र ठरण्याकरिता कामाच्या कौशल्यास स्नातकपूर्व स्तरावर अध्ययन संलग्न करून व्यापसायिक तांत्रिक व व्यवसायभिमुख कौशल्याच्या संधी उपलब्ध करून द्याव्यात, प्रत्येक महाविद्यालयामध्ये कौशल्य शिकविणारी केंदे असली पाहिजेत आणि त्या केंद्रात शिका- विकसित व्हा-कमवा या कार्यक्रमासाठी देखील काम करण्यासाठी केले गेले पाहिजे असे अभ्यासक्रम सुरू करण्याकरिता महाविद्यालयाची सहयोगी व्यावसायिक व अन्य महाविद्यालयांशी भागीदारी असावी व्यावसायिक अभ्यासक्रमांसाठी विद्यार्थी हा पूर्ण वेळ विद्यार्थी किंवा त्याच्या स्वत: च्या वेळी येणारा शिकाऊ विद्यार्थी असेल. जीवन व्यवहार व व्यावसायिक क्षेत्रातील पाठनिर्देशक व

समपदेशक यांची सेवा दुकानांमध्ये किंवा प्लॅटफॉर्मवर काम रनाऱ्या विद्यार्थ्यांसाठी त्यांच्या प्रायोगिक अध्ययना करिता विस्तारित करण्याचे प्रस्तावित करण्यात आले आहे.

अध्ययनार्थी व अध्ययन यांचे मूल्यांकन त्यांनी / तिले ग्रहएर केलेल्या ज्ञानाच्या आधारे प्रत्यक्ष पारीक्षा व आकलन क्षमता याद्वारे परीक्षा मंडळाद्वारे करण्यात येईल. प्रत्येक विद्यार्थ्याला सेवा मिळेल आणि त्यांच्या / तिच्या कार्यानुभवाच्या आधारे पोर्टफोलिओ तयार करण्यात येईल. अध्ययनार्थीयी कामगिरी, क्षमता, सामर्थ्य व सह-सर्जनक्षमता उभारणी यांमधील त्याचे योगदान याकरिता त्यांचे मूल्यांकन करण्यात येईल आणि ते त्यांना वैयक्तिकरीत्या सोपविलेल्या कामावरून करण्यात येईल या ठिकाणी कामागिरीमध्ये व्यक्तिगत मांडणी व व्यावसायिक विकासाचा देखील समावेश आहे.

७. संलग्न विद्यापीठांची पुनर्रचना

अध्ययन इक्ये व्यवस्था आणि इ.व्यासपीठ यांच्या मदतीने अध्ययनार्थी, अध्ययन व सामाजिक विकास यांवर लक्ष केंद्रित करणे हे विद्यापीठाचे कार्य असले पाहिजे. शिक्षण हे समाजिपरिर्वनाचे साधन बनावे म्हणून सामाजिक विकासाशी मूल्य पध्दत एकत्रित करणे हा आमचा दृष्टिकोन आहे.

आम्ही अशी शिफारस करतो की, विद्यमान १० संलग्न विद्यापीठांचे त्यांच्या जिल्हा विद्यापीठ क्षेत्रानुसार विकेंद्रीकरण करण्यात यावे म्हणजे विद्यमान विद्यपीठ क्षेत्राचे स्थानिक / शहर स्वायत्त विद्यापीठामध्ये विस्तारीकरण व पुनर्रचना करण्या खेरीज २५ जास्तीची विद्यापीठ क्षेत्रे निर्माण होतील यासाठी प्रत्येक विद्यापीठ व राज्याद्वारे टप्प्या विकास कार्यक्रम हाती घेण्याची गरज आहे. प्रत्येक विद्यापीठ क्षेत्रामधे अभ्यास व विकास क्षेत्रातील सुमारे ५०० - १००० उच्च शिक्षित व सक्रिय संशोधन शिक्षक व विद्याध्यासंगी असले पाहिजेत आणि प्रत्येक विद्यापीठ क्षेत्रामध्ये स्नातकपूर्व व स्वात कोत्तर अभ्यास व संशोधन यासाठीची एकूण विद्यार्थीसंख्या सुमारे ५०० - १०,००० विद्यार्थी इतकी असावी.

शिक्षणामध्ये सामाजिक विकास, सामाजिक संघटना व स्वयंशासन यांचा अंतर्भाव करण्यासाठी विद्यापीटाद्वारे निश्चित करावयाचा क्षेत्र विकासामधील शालेय अभ्यासांमधून विद्यापीठ संरचनेची पुनर्रचना आम्ही प्रस्तावित केली आहे. शाळांमध्ये विविध विद्ययांच्या

विभागांनी कार्यरत असले पाहिजे आणि विषयाधारित अभ्यासाखेरीज एकत्मिक सामाजिक-अर्थव्यवस्था त्याचप्रमाणे वैज्ञानिक व तंत्रज्ञान विकासविषयक कार्यक्रम प्रस्तुत केले पाहिजेत.

संलग्न विद्यापीठाचे स्वायत्त महाविद्यलये तसेच अस्वायत्त महाविद्यालये या दोन्हींशी संलग्नीकरण केले पाहिजे. अस्वायत संलग्न महाविद्यालयांची विद्यापीठाकडून एल-इको-व्यवस्था मार्फत आणि त्यांच्या सहायोगी संवांमार्फत काम करावे संलग्न महाविद्यालये ही, भागीदारी व्यवस्थेच्या महाजालाचा अंतर्गत भाग बनली आहेत. विद्यापीठाचे काम या महाविद्यालयांच्या विद्यार्थ्यांना पदव्या देणे, आणि स्वायततेच्या संबंधाने त्यांना त्यांच्या संचालनामध्ये मदत करणे आणि कालबध्द कार्यक्रमासह स्वायत्तेचा दर्जा बहाल करणे हे आहे.

संलग्न महाविद्यालयाचा विकास मार्ग पुढेदिल्या प्रमाणे आहेः-

संलग्न महाविद्यालये इ स्वायत्त महाविद्यालये (एनएएसीवी + श्रेणी च्या वर)- पदव्या, पदविका, संबंधित पदवी, इत्यादी देण्यासाठी सक्षम असलेले स्वायत्त महाविद्यालय.

गुणवत्ता व सर्वोत्कृष्ट आश्वासक आणि संलग्न (क्यूई) परिषदेने, पुरविलेल्या सेवांवर शर्ती लादण्याची आणि विद्यापीठांशी संलग्नीकरण करण्याची प्रक्रीया विहित करण्याची, संपूर्ण स्वायतत्ता ही, विद्यापीठांना आहे. पण त्यासाठी संलग्न महाविद्यालयाचा त्यांच्या विभागातील व वसतिस्थनातील विकासात्मक शिक्षणविषयक दर्जा आणि अनुरुपता यासाठी समर्थन करून अत्यावश्यक असलेली कारणे दिली पाहिजेत. अध्ययनार्थी व अध्ययन विकास स्तरीय पध्दतीस मोठ्या संस्थेने पांठिवा मिळने याची सुनिश्चिती केली पाहिजे, निम्न स्तरावर व्यावसायिक / पेशाविषयक अभ्यासक्रमयाशी संबंधित पदवी (एक - दोन वर्षाचा पाठ्याक्रम) मध्यला स्तरावर पुढील पदवी पाठ्यक्रम (पुढचे एक / दोन वर्षे ) देण्यात आला आहे आणि तिसरा स्तर हा उच्चतम अध्ययन अभ्यासक्रमाची सर्जनशील पातळी विकास व कार्य निपुणता (पुढील २-३ किंवा त्याचे अधिक वर्षे होईल) यासाठी आहे.

**८. अध्ययनार्थी व विद्यापीठांची / संलग्न महाविद्यालयाची स्वायतता**

पाठ्यक्रम प्रस्तुत करणे आणि वैयक्तीक व सामाजिक विकासाचे आदर्श विकासित करण्याकरिता अध्ययन सेवांना पांठिबा देणे यांसाठी आणि विकेंद्रित वैयक्तिक व गट / संस्थाविषयक भवितव्य घडविण्यासाठी अध्ययनार्थीना आणि शैक्षणिक संस्थाना स्वायतत्ता असणे अत्यावश्यक आहे व ती एक महत्वाची भूमिका आहे. खासकरून नवीन आधुनिक व

औद्योगिकोत्तर सोसायट्या उदयास येताना कोणताही निर्बंधित व साचेबध्द दृष्टिकोन यामुळे उद्दिष्टप्राप्तीस अडथळा येण्याची शक्यता आहे आणि २०२० / ३० पर्यंत  अग्रगण्या ठरणारे विकासित राष्ट्र आणि समाज निर्माण करण्याचे भारताचे स्वप्न धुळीसे मिळेल. ए-३ संबंधित सोसायटी मधील राज्याची त्यांच्या अध्ययनार्थींना नागरिकांना आणि एल-३ व विकसित साजातील जनतेला संरक्षण देणे आणि शोषणयुक्त व दयनकारी स्वयंमागणी यापासून त्यांच्या नव उदारमतवादीपणांची सुनिश्चिती करणे ही प्रमुख जबाबदारी आहे.

अध्ययनार्थीला त्याचा / तिचा आवडीचा पाठ्यक्रम निवडणे आणि त्याचीं  / तिची अध्ययन व विकासविषयक उद्दिष्टे ठरविण्यास पंसतीक्रम देणे याचे स्वातंत्र्य आहे व तसा अधिकार आहे. आणि त्याला कर्तव्ये, विश्वासर्हता व जाबाबदारी यांसह अनुपालन करावे लागेल. शिक्षक हा, अध्ययनार्थी सहकारी व सहनिर्माता असतो, आणि त्याला अध्ययनार्थी मदत करणे अध्ययन व समाजिक विकास / परिवर्तन अशा अनेक सहय्यभूत भूमिका पार पाडाव्या लागतात. अध्ययत समुदायाच्या लाभाकरिता ओईआर मधील त्याच्या पाठ्यक्रमाच्या अध्ययन व सहाय्यभूत साहित्य प्रत्येक शिक्षकाने सादर करणे हे त्याचे कर्तव्य आहे.

शिक्षक हे विद्यमान व कायमस्वरूपी कर्मचारी असू शकतील किंवा कायमस्वरूपी पदावर नियत अवधीसाठी असू शकतील किंवा नियत अवधीवर व बाहेरून सेवा घेतलेले कंत्राटी असून शकतील. शिक्षकांनासोसायटी उद्योग, व्यवसाय, ज्ञानर्जनाचे क्षेत्र कारखाना कामगार इत्यादीमधून ते तज्ञ असतील तर आणि अध्ययनार्थीनां त्यांचे अध्ययन व समाजिक विकास यासाठी योगदान देऊ शकत असतील तर आकर्षित करावयाचे आहे

विद्यापीठ व्यवस्थापन संस्थाः समानता व न्ययावर आधारित सामाजिक विकास व स्वायत्त स्वयंशासन यांची भर पडल्यामुळे विद्यापीठ प्रधिकरण व संस्था यांमध्ये मोठे बदल घडून आले आहेत. समाज हा स्वातंत्र्य, समता, बंधुता व न्याय या मूल्यांवर आधरित आहे. आणि लोकशाही, धर्मनिरपेक्षता व समाजवाद भारतीय संविधानाची आवश्यकता द्वारे संघटित आहे.

**९.उच्च शिक्षणाची स्वयंपूर्णता व आधारक्षमता**

स्वयेंपूर्णतेसाठी विद्यापीठाने आपल्या वित्तीय, विद्याविषयक , तंत्रानविषयक व मनुष्यबळ यांचा कायम पुरवठा या साधनांसाठी हितसंबंधित व्यक्तींवर अवलंबून राहावे. जेव्हा शिक्षण क्षेत्रामध्ये केंद्राने आणि महाराष्ट्र राज्याने खजगीकरणाचे धोरण स्वीकारले आहे तेव्हा

सार्वजनिक विद्यापीठांसाठी आणि संस्थांसाठी खाजगी संस्थांमध्ये ज्याप्रमाणे अध्ययन करण्यात येते व विकासाविषयक शिक्षण देण्यात येते / त्यास चालना देण्यात येते त्याप्रमाणे तयाच स्तरावर शिक्षण देणे अतयावश्यक आहे.

व्यक्तीसांठी आणि गटांसाठी अध्ययन व विकास मार्गा निर्माण करण्यातकरिता अध्ययन प्रक्रीयेमध्ये सामाजिक विकास, भौतिक व सामाजिक संपदेख्री निर्मिती यांचा अंतर्भाव करण्यात आला असल्याने शिक्षणास सहाय्यभूत ठरणारे अनेक मार्ग उदयास आले आहेत सार्वजनिक संस्थांचे धोरण हे त्याच्या उत्पन्नामधून फी (शुल्क) तसेच सामुदायिक सहभाग यामधून कार्यात्मक खर्च प्राप्त असले पाहिजे. सार्वजनिक विद्यापीठांचा संपूर्ण विकासत्मक खर्च हा राज्य शासन व प्रकल्प कामे यांच्या मार्फत भागविला पाहिजे.

काही धोरणत्मक शिफारशीः

व्यक्तिगत स्तराशी संबंधित शिफारशी पुढील प्रमाणे आहेतः-

युनिट खर्च आधारित फी आकारणे

शिक्षण शुल्कासकरिता विद्यार्थ्यास व्यक्तिगत अर्थसहाय.

शिक्षणासाठी सुलभ कर्जे

शिका-विकास करा- कमवा या कार्यक्रमाद्वारे स्वसहाय्य शिक्षण (विकासातून व संपती निर्मिती यामधून व सामाजिक जाणीव यामधून अध्ययना साठी पत निर्माण करणे)

खाजगी व सार्वजनिक संस्था या दोन्हींना शर्ती व संदर्भ यांची समानता निर्माण करता यावी म्हणून विद्यापीठे व महाविद्यालये यांच्याकडे निधी व अनुदाने यांचा ओघ असला पाहिजे यासाठी नवीन शिक्षण पध्दतीमध्ये समाता व न्यायाची उभारणी केली पाहिजे. जेणेकरून अध्ययन विकास व संपत्तीची निर्मीती याद्वारे विद्यार्थ्यांना त्यांचे शिक्षण घेता येईल. सर्व राज्य व केंद्र सरकारची अनुदाने, विद्यार्थीना व त्यांच्या विकासात्मक अध्ययनासाठी वैयक्तिक व जबाबदारी या आधारावर महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण विकास आयोगा मार्फत देण्यात यावीत. विद्यापीठांना आणि महाविद्यालयांनी मिळणऱ्या विकास विषयक अनुदानातून महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण व विकास आयोगाने दिलेल्या केद्रिय संवांसाठी सेवा आकार भरावा त्यामुळे जगतिक स्थानिक किंवा मध्यवर्ती स्थानिक किंवा मध्यवर्ती-स्थानिक शिक्षण व विकास यंत्रणा ही स्वयंसहाय्यित व अंनियतः ती सामाजिक दृष्ट्या अवलंबी ठरेल.

नवीन साधने: विद्यापीठ वसाहत व पीपीसी-भागीदारी

विद्यापीठाने त्याच्या सर्व हितसंबंधित व्यक्तीबरोबर भागीदारत काम करावे आणि ज्यामुळे सामाजिक व आर्थिक दृष्टिने जागतिक व स्थानिक स्वरूपाची प्रगती करता येऊ शकेल अशा अध्ययन व विकसित संस्थेच्या २१ व्या शतकाशी संबंधित समाजाची नवीन वसाहत निर्माण करावी ही संकल्पना बाळगून शिक्षण प्रक्षेत्र म्हणून जिल्ह्यांमध्ये नवीन विद्यापीठ वसाहत निर्माण करता येऊ शकेल. जनता सध्या ज्या क्षेत्रातील वसातीमध्ये राहत आहे अशा क्षेत्राची ओळख निश्चित करून आणि त्यांना भावी विकासाचे व संपत्ती निर्मितीचे भाग धारक बनवून विकासामध्ये, संपूर्ण जागतिक ज्ञानाचा, साधनपंचा व तंत्रज्ञानाचा वापर केला पाहिजे. विद्यापीठ क्षेत्रांनी या ज्ञानसंबंधित अर्थव्यवस्था व सोसायटीच्या या पुनर्वसाहती व पुनर्रचने बरोबर आपली स्वतःची जागा यांचा शोधली पाहिजे काही खाजगी व्यवसाय उद्योग प्रश्न / कमाल नफा दृष्टिकोन असताना, ही पुनर्वसाहत व पुनर्रचना, सामाजिक व्यवसाय / उत्पादन / पणन मूल्यनिर्मिती प्रा.मोहमद युनूस यांच्यामते यांचा नमुना म्हणून उदयास आली पाहिजे. नवीन युगाच्या वसाहती निर्माण करण्याकरिता आणि विद्यापीठांना त्यांच्या सामाजिक भांडवली अंशदानामधून अध्ययन आणि सामाजिक विकास करण्याकरिता नवयुग साहतीची निर्मिती करण्यासाठी टाटा, विप्रो, विलग्रेट्स इत्यादीसारख्या काही कार्पोरेटसचा धर्मार्थ संस्थांता आमंत्रित करता येईल.

सर्व विद्यापिठांचे विद्यार्थी, शिक्षक व व्यवस्थापन यांनी अशा अध्ययन व विकास पावणाऱ्या सोसायटीच्या आणि त्यांच्या पुनर्रचित विकासात्मक शिक्षणाच्या आमुलाग्र पुनर्रचना करण्याच्या आव्हानामध्ये सक्रिय भूमिका बजावावी.

## १९.० शिखर समितीच्या शिफारशी

### १. सर्वसाधारण शिफारशी :

महाराष्ट्रातील उच्च शिक्षणामध्ये शासन, शैक्षणिक श्रेष्ठत्त्व, उत्तीर्ण होणाऱ्या विद्यार्थ्यांची रोजगारक्षमता, सामाजिक-आर्थिक विकास- विषयक गरजा पूर्ण करणे, स्वायत्तता, जबाबदारी, इत्यादींच्या स्वरूपातील भरीव सुधारणा होणे आवश्यक आहे. खाली विशिष्ट शिफारशी दिल्या आहेत.

## **१.१ शैक्षणिक श्रेष्ठत्त्वासाठी स्वायत्तता अधिक बळकट करणे व मान्यवर (पीर) निर्धारण कार्यपद्धतीवर लक्ष केंद्रित करणे**

शैक्षणिक श्रेष्ठत्वाचे 'स्वायत्तता' व 'मान्यवर निर्धारण ' हे दोन मुख्य स्तंभ आहेत. म्हणून विद्यापीठे निकोप अशा मान्यवर निर्धारण कार्यपद्धतींद्वारे राज्याला पूर्णपणे व समाजाला सामान्येकरून जबाबदार असण्यासाठी पूर्णपणे स्वायत्त असावीत. बाहेरील मान्यवर हे कशाप्रकारे समजून घेतात यावर विद्यापीठाच्या गुणवत्तेचे मूल्यांकन करावे. प्रबल सकारात्मक मूल्यांकनामुळे यंत्रणेचा सकारात्मक प्रतिवृत्तांत तयार होतो. त्यामुळे चांगली बाह्य बुद्धिमत्ता (विद्याशाखा, संशोधक व विद्यार्थी) त्याचप्रमाणे साधनसंपत्ती आकर्षित होत. म्हणून बाहेरील मान्यवरांनी ठराविक कालांतराने विद्यापीठामधील प्रत्येक कार्यक्रम व कार्यपद्धती यांचे निर्धारण करावे. म्हणून, विद्यापीठाने परिस्थितीच्या निकोप व संयुक्तिक व तर्कसंगत हाताळणीकरिता, विविध संरचित व असंरचित मान्यवर आंतरसंवाद प्रक्रियेला चालना दिली पाहिजे.

निवडणूकार्यापेक्षा ही एक सुसंगत मान्यवर कार्यपद्धती असून ती यशस्वी झाली पाहिजे. सुसंगत मान्यवर कार्यपद्धतीमुळे श्रेष्ठत्वामध्ये वाढ होते, तर निवडणूक कार्यामुळे मध्यम प्रतीचा माणूस तयार होतो. याचा अर्थ असा मुळीच नाही की, बहुमताचा आदर करू नये. याचा साधा अर्थ असा आहे की, शैक्षणिक श्रेष्ठत्त्वाच्या दृष्टिकोनातून जो मार्ग सयुक्तिक व तार्किकदृष्टया योग्य आहे त्याचाच निर्णय प्रक्रियेमध्ये विचार व्हावा.

## **१.२ संशोधन व सामाजिक विकास कार्यक्रम जोपासणे**

विद्यापीठ हे असे स्थान आहे जेथे मुक्त वातावरणामध्ये ज्ञान निर्माण केले जाते व त्याचा प्रसार होतो. समकालीन, जागतिक स्तरावर स्पर्धात्मक व स्थानिक स्तरावर संबंधित अशा उच्च दर्जाच्या संशोधनाला जोपासणे हा विद्यापीठामध्ये संबंधित ज्ञानविषयक कार्यक्रम टिकवून ठेवण्याचा मुख्य भाग आहे.

विद्यापीठामध्ये त्याच्या विद्यार्थ्यांचा -जे जीवनात येणाऱ्या आव्हानांना तोंड देऊ शकतील आणि समाजाच्या विकासामध्ये सहभागी होतील- सर्वंकष विकास व्हावा असे वातावरण असले पाहिजे. विद्यापीठाने सामाजिक विकास केंद्रस्थानी ठेवून शैक्षणिक श्रेष्ठत्त्व वाढविले पाहिजे.

**१.३ विद्यापीठाच्या बहु-विद्याशाखीय स्वरूपाला संरक्षण देणे व त्याचे संवर्धन करणे :**

खऱ्या आयुष्यात येणाऱ्या समस्या हाताळण्यासाठी बहु-विद्याशाखीय दृष्टिकोन अपरिहार्य आहे, हे पुरेसे स्पष्ट झाले आहे, खऱ्या आयुष्यात क्वचित काही समस्या अशा असतील ज्यांचा एका किंवा दुसऱ्या विद्याशाखेमध्ये बंदिस्त करता येईल. म्हणून अध्ययनाचे केंद्र हे, खऱ्या आयुष्यातील समस्यांवरील संशोधन आणि शक्य तेवढया विविध विद्याशाखांमधील अध्यापन यांच्या भोवतीच असले पाहिजे. विद्यमान सर्व विद्यापीठ क्षेत्रे ही आघाडीचे संशोधन व सामाजिक-आर्थिक विकास या कामांमध्ये गुंतून राहण्याइतपत समृद्ध असली पाहिजेत.

आणखी असे की, शक्य होईल तेवढी नवीन व्यापक विद्यापीठ क्षेत्रे (सरतेशेवटी प्रत्येक जिल्ह्यामध्ये एक) विकसित करणे यावर भर दिला पाहिजे. त्यांचे कार्यक्रम व पायाभूत सोईसुविधा विकास हा खास करून शेजारील प्रदेशाच्या सध्याच्या व नव्याने निर्माण होणाऱ्या सामाजिक तंत्रविद्याविषयक गरजांशी संबंधित असावा. विद्यापीठाच्या अध्ययनाचे केंद्रस्थान विस्तृत असणे आवश्यक आहे. परिपूर्ण विद्यापीठक्षेत्र नसलेले विद्यापीठ असू नये.

आजकाल सर्व विद्यापीठांशी संलग्नित एकाच विद्याशाखा असण्याकडे जास्त कल असून त्याला महत्त्व आहे, कारण जसजशी महाविद्यालये व व्यवसाय वाढत जातात तसतसे त्यांचे प्रशासनाला महत्त्व येते, परंतु अशाप्रकारे एकाच बाजूने विचार करणे हे ज्ञानाचा शोध व महत्त्व यावर दीर्घकालीन विरूद्ध परिणाम करणारे ठरू शकते. अशाप्रकारच्या विद्यापीठांना बहुविद्याशाखीय करण्यासाठी प्रोत्साहन दिले पाहिजे आणि एकच विद्याशाखा किंवा व्यवसाय किंवा केंद्र असणारी नवीन विद्यापीठे टाळली पाहिजेत.

## १.४ अध्ययन केंद्री दृष्टिकोनाकडे वाटचाल

पारंपरिक विद्यापीठे एकाच विषयाला केंद्रस्थानी ठेवून शिकवत होती.मुक्त अर्थव्यवस्थेच्या आजच्या आधुनिक युगात उच्च शिक्षणातील शिक्षकांची भूमिका अध्ययन सुविधाकार व ज्ञान निर्माणक अशी बदलली पाहिजे.

आणखी असे की, नव्याने उदयास येणाऱ्या ए३ युगामध्ये संबंधित समाज, विद्यापीठ यांनी आजीवन अध्ययनाच्या संधीपासून पूर्ण फायदा घेऊ शकतील असे विद्यार्थी तयार करावेत. ही संधी विद्यार्थ्यांच्या यशस्वी जीवनाची गुरुकिल्ली असू शकेल.

म्हणून ज्ञानाचा प्रसार करण्याची प्रक्रिया ही 'अध्ययन केंद्री ' असावी, म्हणजेच अध्ययन कसे झाले यापेक्षा अध्यनावर जास्त भर देणारी असावी. अध्ययन केंद्री दृष्टिकोनामुळे विद्यार्थी जास्त जबाबदार बनतात व शिक्षक हे संशोधन व ज्ञानाची निर्मिती यांमध्ये अधिक निर्माणक बनतात.

## १.५ उच्च शिक्षण क्षेत्राला ' सर्वोच्च प्राथम्य ' व फायदे देणे :

राज्याच्या १८ टक्के इतका असलेला जीईआर हा विकसनशील देशांच्या सरासरी जीईआर पेक्षा खूपच कमी आहे, हे सर्वांनाच माहीत आहे. राज्यातील उद्योगधंद्यामध्ये होणारी वाढ व अपेक्षित आर्थिक विकास लक्षात घेता, उच्च शिक्षण क्षेत्राला ' सर्वोच्च प्राथम्या 'चा दर्जा दिला पाहिजे. चालू ३.५ टक्के इतक्या अर्थसंकल्पीय सहाय्यावरून ६ टक्के इतके अर्थसंकल्पीय अर्थसहाय्य वाढले पाहिजे, अशी शिफारस आम्ही करीत असलो, तरी बहुविध वाढीसाठी इतर प्रोत्साहकांचादेखील विचार करण्यात यावा.

महाराष्ट्र शासनाने विद्यापीठांकरिता अर्थबळ उभारण्यासाठी विशेष आर्थिक व इतर प्रशासकीय साधने /सवलती निर्माण कराव्यात. जमीन, पाणी, वीज, परिवहन व इतर सुविधा आणि विकासात्मक निपटारा प्रमाणपत्रे शैक्षणिक संस्थांना प्राथम्यक्रमाने पुरवावीत.

मुख्य शहरांपासून लांब असलेल्या शैक्षणिक केंद्रांच्या जवळपास नवीन वसाहती विकसित करण्याकरिता विशेष तरतूद करण्यात यावी. यामुळे केवळ शहरांच्या पायाभूत सोईसुविधांवर

पडणारा भारच कमी होणार नाही तर ग्राम विकासामध्ये देखील मदत होईल आणि संपूर्ण राज्यभर संपत्तीचे समान वितरण होईल.

असे प्रस्तावित करण्यात येत आहे की, महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियमाअन्वये योग्य अधिसूचनांद्वारे राज्याने विद्यापीठांना विशेष नियोजन प्राधिकरणाचा दर्जा प्रदान करावा. महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण व विकास आयोगाबरोबर (खाली दर्शविले आहे, पहावे) योग्य देखरेख व संतुलन यांसह केल्यास त्यामुळे, परदेशातील काही सर्वात वरच्या दर्जाच्या विद्यापीठांमध्ये अनुभवायला मिळते त्याप्रमाणे शैक्षणिक वातावरण खरोखरीच समृद्ध होईल.

**२. नवीन राज्य स्तरीय उच्च शिक्षणविषयक शासकीय यंत्रणा स्थापन करणे : (महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण व विकास आयोग ) (माहेड)**

**२.१** महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण व विकास आयोग स्थापन करण्यात यावा. महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण व विकास आयोगाचे, राज्यामध्ये त्याचप्रमाणे परदेशातही उच्च शिक्षणविषयक धोरणांचा विकास करण्यासाठी आणि उच्च शिक्षण मिळणे कायमच सुलभ व्हावे म्हणून समुचित व पर्याप्त स्वायत्तता असणारे स्वतंत्र वैध अस्तित्व असेल. त्याला राज्याकडून निधी देण्यात येईल. ज्येष्ठ विद्याभ्यासी, शास्त्रज्ञ, तंत्र सत्ताधीश, व्यवसाय व उद्योग तज्ञ व अर्थ तज्ञ हे या आयोगाचा कारभार पाहतील. राज्य शासनाकडून सरकारी विद्यापीठांना निधी देण्यासाठी तो एक मार्ग असेल.

**२.२** महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण व विकास आयोगाला एका बाजूला राज्यपाल अध्यक्ष असणाऱ्या शिखर सल्लागार नि पर्यवेक्षकीय परिषदेकडून तर दुसऱ्या बाजूला व्यापक पायावर आधारित विद्याविषयक व विकास परिषदेकडून मार्गदर्शन मिळेल.

**२.३** आयोग हा शासन व विद्यापीठे यांच्यामधील पुलाचे काम करील. म्हणून, आयोग हा, राज्यातील उच्च शिक्षण विषयक धोरणांसाठी शासनाकडून वेळोवेळी आवश्यक मूलभूत गोष्टी संपादित करील.

**२.४** राज्यातील शैक्षणिक व विकासात्मक कार्यक्रमांचे संकलन करणे ही आयोगाची आद्य भूमिका असेल.

**२.५** सर्व विद्यापीठे आयोगाला उत्तरदायी असतील.

**२.६** कुलगुरू त्याचप्रमाणे राज्यातील उच्च शिक्षणाच्या आराखडयाला सहाय्य करण्यासाठी उभारावयाच्या इतर संस्था यांचे प्रमुख यांची नियुक्ती करण्यामध्ये आयोगाची मध्यवर्ती भूमिका असेल.

**२.७** आयोग हा विद्यापीठांकरिता शासनाचे निधीविषयक धोरण निश्चित करील.

**३. विद्यापीठ स्तरावर शासनाच्या सुधारणा :**

**३.१ विद्याविषयक, संशोधन व विकास व नवोपक्रम यांवर लक्ष केंद्रित करणेः**

विद्यापीठाने आपल्या प्राथमिक कार्यावर लक्ष केंद्रित करत राहणे म्हणजेच, प्रचलित ज्ञानाच्या अंतिम टप्प्यापर्यंत सर्वमार्गाने अध्ययन व शिष्यवृत्ती देणे सुलभ करणे, ज्ञानाच्या अंतिम टप्प्यापर्यंतची गती देण्यासाठी, अग्रभागी राहणारे तंत्रज्ञान, अडचणी शोधून काढण्यासाठी नवोपक्रम लढविणे यासाठी संशोधन करणे आणि उद्योगामध्ये/समाजामध्ये संधी निर्माण करणे व समाजामध्ये संपत्ती उत्पन्न करू शकेल असे उपक्रमित्व यासाठी संशोधन करणे. संलग्न करून घेतलेल्या महाविद्यालयाच्या प्रसाराच्या (जाळयाचे) व्यवस्थापनाचा विद्यापीठावरील सध्याचा हा मोठया प्रमाणावरील भार, प्रत्येक विद्यापीठामध्ये स्वायत्त परीक्षा मंडळे स्थापन करून त्यामार्फत तो कमी केला जावा आणि महाविद्यालयांना स्वायत्त श्रेणीबद्ध करण्यास मान्यता देणे.

**३.२ निवडणुका नाहीत :**

निवडणूककार्य यापेक्षा ही एक परिपक्व अशी मान्यवर प्रक्रिया आहे. (यामध्ये आतील व बाहेरील अशा दोन्ही मान्यवरांचा समावेश होतो) आहे. ती विद्यापीठामध्ये अधिभावी व्हावी. समिती अशी शिफारस करते निवडणूक घेणे बंद करावे.

**३.३ कार्यचालनाची तत्त्वेः**

आणखी, जे नियम विद्यापीठाचे नियमन करतात, त्यामध्ये साचेबंद गुणात्मक अटीं ऐवजी तत्त्वे घालून दिली जावीत.

**३.४ मान्यवर अधिष्ठित महाविद्यालयीन व्यवस्थाः**

महाविद्यालयीन विषयात्मकता ही चांगल्या प्रथा प्रस्थापित करून आणि मंडळाच्या नियमांची मान्यवर अधिष्ठित महाविद्यालयीन व्यवस्थेचा निर्णय यांची अर्थउकल यांनवर विश्वास ठेवून उद्देश साध्य करावा. महाविद्यालयीन आस्थापना स्वतःहून याचसारख्या प्रक्रिया अवलंबतील. आपल्याला या महत्त्वाच्या सुधारणा आणण्यासाठी विद्यापीठ अधिनियमांमध्ये बदल करणे आवश्यक आहे.

**३.५ निधी पुरविणे :**

प्रत्येक विद्यापीठाला पूर्वी ठरवून दिलेल्या प्रमाणपद्धतीच्या आधारावर आणि सेवाप्रवेशांच्या अनुसार त्यावर तिचा निर्णय घेतला गेल्यावर आणि सार्वजनिक खर्चाच्या परामितिकीमध्ये अन्य खर्च पूर्णतः स्वायत्त होईल; त्यानुसार आश्वासित अर्थसंकल्प प्राप्त होईल.

विद्यापीठांना त्यांच्या अनेकविध कार्यक्रमांना ज्यांना अन्यथा पाठबळ मिळत नाही त्यांना पाठबळ देताना भरीव दाननिधीची उभारणी करता यावी म्हणून आटोकाट प्रयत्न करावेत. देणगीदाराचा पाठींबा मिळण्यामध्ये वाढ होण्यासाठी विद्यापीठाच्या कामामधील स्वायत्तता हा एक महत्त्वाचा घटक आहे.

विद्यापीठांना व्यावसायिक क्षमतेच्या आवर्धनाच्या माध्यमातून तिच्या आर्थिक व्यवस्थापन यंत्रणेला बळकट करण्याकरिता उत्तेजन द्यावे. येथे असा आत्मविश्वास असावा की विद्यापीठाला देण्यात येणारा कोणताही आधार हा, शक्य होईल अशा चांगल्या मार्गाने उद्देशित केलेल्या वापरासाठी घेतलेला असावा.

**३.६ अधिकार प्रदान केलेले नेतृत्त्व :**

कुलगुरु हा विद्यापीठाचा एकमेव विद्याविषयक व प्रशासकीय प्रमुख असावा. कुलगुरु यांना सल्ला देण्यासाठी, खुल्या सक्षम व आर्थिकदृष्टया बळकट प्रशासनासहित विद्यापीठाला प्रमुख ज्ञान केंद्र बनविण्याकरिता धोरणात्मक संरचना व डावपेचात्मक योजना यावर काम करणाऱ्या त्याच्या/तिच्या विविध प्राधिकरणांना व अधिकाऱ्यांना सल्ला देण्यासाठी, विद्यापीठाचे कोणतेही

मंडळ याच्याशी संबंधित नसलेल्या प्रख्यात तज्ञ मिळून बनलेली एक सांविधिक सल्लागार समितीही तयार करण्यात यावी. सांविधिक सल्लागार समिती ही, जागतिक पातळीवरील व्यवस्थेमध्ये सातत्याने होणारे बदल प्रतिबिंबित होणाऱ्या नवकल्पना आणणारी एक दुवा बनावी.

**३.७** विद्यापीठाच्या व्यवस्थापन मंडळास प्रतिनिधित्व मिळावे/ सर्व हितसंबंधितां सल्ला मिळावा. अशा मंडळाने मानव साधन विकास, संशोधनातील श्रेष्ठत्त्व, तंत्रशास्त्र/ त्यावरील उपाय, संस्था/उद्योग यामधील अभिसंकेत व त्यातील पुढील टप्पा गाठणे, रोजगारक्षमता इत्यादींच्या बाबत अपेक्षित कामगिरी स्थिर चिन्हे निश्चित करणे, इत्यादी.

## ३.८ अधिसभेच्या जागी संस्था भागीदारी परिषदेची पुनःस्थापना करणे.

विद्यापीठ आणि संस्था यामध्ये जवळीक निर्माण करण्यासाठी संस्थांच्या तसेच विद्यापीठांच्या कार्यक्रमांना मोठया प्रमाणात प्रतिसाद मिळण्याची आवश्यकता आहे. असे सूचविण्यात येते की, अधिसभेच्या जागी " संस्था भागीदारी परिषद" (एसओयुएल) असे नाव असलेल्या सल्लागार मंडळाची पुनःस्थापना करण्यात यावी. संस्था भागीदारी परिषद ही विद्यापीठ व्यवस्था व संस्थांमधील विविध हितसंबंधित व्यक्ती यांमधील एक दुवा असेल. परिषदेचा खरा कल विद्यापीठामधील नामनिर्देशित सदस्यत्व, मिळालेल्या विविध हितसंबंधित व्यक्तीमार्फत प्रतिबिंबित होईल. कुलपति (राज्यपाल) हे परिषदेचे प्रमुख असतील व विविध हितसंबंधित व्यक्तींचे प्रतिनिधित्त्व करणारे परिषदेचे संपूर्ण सदस्यत्व हे, कुलगुरुकडून सुचविण्यात आलेल्या नावांमधून, कुलपतीकडून नामनिर्देशित केले जाईल.

## ४. परिणामकारक विद्यार्थी शिकाऊ केंद्रगत विद्याविषयक संरचना विकसित करणे.

## ४.१ आवडीवर आधारित मॉडयूलर क्रेडिट :

उच्च शिक्षणामधील विद्याविषयक संरचनेत, विद्यार्थ्यांना त्यांच्या अंगभूत संभाव्यताचा पूर्णपणे वापर करताना त्यांच्या आवडीप्रमाणे क्षेत्र निवडून त्यामध्ये श्रेष्ठत्त्व प्रस्थापित करण्याचे अधिकार असले पाहिजेत.

शिकाऊ केंद्रगत अध्यापन पद्धतीचा एक भाग म्हणून, त्यांना पारखणे आवडेल असा पाठ्यक्रम निवडताना विद्यार्थ्यांच्या दृष्टीने पाहता पदवीच्या लवचिकपणासहित, संपूर्ण विद्याविषयक कार्यक्रम विशेष योग्यतेवर आधारित असावा. जोपर्यंत ते जेथे त्यांचे नाव नोंदवले आहे त्या संस्थेत विशेष योग्यता यामध्ये विनिर्दिष्ट किमान अंक ज्याने मिळविले आहेत त्याला पदवी संपादन करण्यासाठी आवश्यकतांची पूर्तता करून विशेष योग्यतेच्या हस्तांतरणासह, अन्य संस्थाकडून प्रस्तुत केलेले पाठयक्रम निवडण्याचे स्वातंत्र्य असावे.

**४.२ सखोल संशोधन व औद्योगिक एकत्रिकरण :**

उच्च शिक्षण व्यवस्था ही विद्यार्थ्यांना बुद्धीने तल्लख व त्याचे पसंतीक्रम, रोजगारक्षम या विषयांमध्ये ज्ञानी बनविते व उच्च दर्जाचा नीतीशास्त्रीय व नैतिक योग्यतेचा नागरिक बनविते.

विद्यापीठांना, राष्ट्रीय प्रयोगशाळेशी व उद्योग/संस्थांशी, सर्वांगीण अध्ययन पर्यावरण समृध्द करणाऱ्या कार्यक्रमांसाठी विद्यापीठांच्या क्षेत्रामध्ये, त्यांच्या प्रत्यक्ष उपस्थितीच्याद्वारे, संबंध बळकट करण्यासाठी अधिकार व उत्तेजन देण्यात यावे. अशी विद्यमानता ही विद्याविषयक केंद्राच्या, संशोधन प्रयोगशाळा किंवा मोठया सहकार तत्त्वावरील प्रकल्पाच्या स्वरूपात असेल. अशा व्यवस्थेचा लाभ कमाल मर्यादेपर्यंत वाढविण्यात विद्याअभ्यासक व संशोधक यांची चलनशीलता हा एक महत्त्वाचा घटक आहे व त्यावर विशेष लक्ष देण्यात यावे.

**४.३ अभ्यासक्रमाचे तीन घटक :**

म्हणून विद्याविषयक अभ्यासक्रमांत तीन प्रमुख घटक अनिवार्य असावेत.

(एक)विवक्षित ज्ञानशाखेमधील मूलभूत क्षमता.

(दोन) आंतर-शिस्तविषयक घटक.

(तीन) व्यवसाय शिक्षण घटक.

जरी अनिवार्य असले तरी या तीन घटकांमध्ये पुरेसा असा लवचिकपणा असावा. अर्थात असे म्हणता येईल की, या प्रत्येक घटकाखाली वैयक्तिक गरजा भगाविणाऱ्या विषयांची निवड करताना भरपूर पसंती देता यावी.

## ४.४ जिल्हा/तालुका व्यवसायशिक्षणात सहभागी होण्याची सुविधा :

ज्याअर्थी, विद्यापीठाच्या व्यवस्थेमध्ये मूलभूत क्षमता आणि बहुविध शिस्तविषयक निपुणता विकसित करण्यात येईल, त्याअर्थी औपचारिक विद्यापीठ/महाविद्यालय व्यवस्थेच्या बाहेर व्यवसाय शिक्षण घटक विकसित होवू शकेल.

अंतर्गत सुविधा विकसित करण्याशिवाय व बाह्य सेवा घेण्याबरोबर महाविद्यालयांमार्फत वेगळी विभागणी करून त्या पद्धतीने ज्या सुविधा वावरता येऊ शकतील अशा सामाईक सुविधा प्रत्येक तालुक्यामध्ये /जिल्ह्यामध्ये निर्माण करण्याकडे विशेष लक्ष देण्यात यावे. वर्गखोल्यांव्यतिरिक्त क्षेत्राच्या गरजांशी आणि विद्यार्थ्यांच्या मूलभूत ज्ञानशाखेशी संबंधित प्रत्यक्ष कौशल्ये हाताळण्यासाठी अशा सुविधा बसविलेली लहान यंत्रे/साधनसामग्री बसविण्यात यावी.

तालुक्यातील /जिल्ह्यामधील कार्यक्रम विकसित करण्यासाठीच्या खर्चामधून विनिर्दिष्ट टक्केवारी, अशा सुविधा सार्वजनिक खाजगी प्रकल्प पद्धतीने उभारण्यासाठी आणि कार्यान्वित करण्यासाठी येणारा भांडवली खर्च भागविण्यासाठी राखून ठेवण्यात यावी, असे सुचविण्यात आले आहे.

## ५. उच्च शिक्षणातील माहिती व संसूचना तंत्रज्ञानांच्या पायाभूत सोयींमधील गुंतवणुकीत वाढ

राष्ट्रीय माहिती जाळे हा महत्त्वाचा विकास असून तो सध्या कार्यरत होत आहे. या नवीन शक्यतांचा पूर्णतः फायदा उठविण्यासाठी महाराष्ट्राला वेगाने प्रगती करावी लागेल. असा दृष्टिकोन समोर ठेवून महाराष्ट्रातील सर्व विद्यापीठांना, अध्यापन केंद्रीभूत शिक्षण आराखडा आणि खुले अध्ययन व्यासपीठ निर्माण करण्यामध्ये अंतर्भूत करता येऊ शकेल.

सर्व विद्यापीठांमध्ये सर्वंकष माहिती व संसूचना तंत्रज्ञानाच्या पायाभूत सोयींसह महाराष्ट्र राज्य उच्चशिक्षण माहिती संसूचना जाळे (एमएस-ईडीयूएनईटी) निर्माण करण्याची आम्ही शिफारस करतो.

**६. उद्योग-विद्यापीठीय जगतामध्ये भागीदारी सुकर करणे व प्रोत्साहन देणे**

विद्यापीठीय जगतात पैशाचे ज्ञानात रूपांतर होते आणि उद्योग जगतात ज्ञानाचे संपत्तीत रूपांतर होते, असे म्हटले जाते. म्हणून, हे उघड आहे की, पुनर्निर्माण चक्र पूर्ण होण्याकरिता उद्योग व विद्यापीठीय जगताने एकमेकांच्या सहकार्याने काम केले पाहिजे. उद्योग जगताला बाजारातील गरजांची नेहमीच जाणीव असते आणि त्या प्रयोजनासाठी उपाय व उत्पादित वस्तू शोधण्याचे काम सातत्याने चालू असते. आणखी हा असा उद्योग आहे की जेथे उत्पादित वस्तूंचे वापरकर्ते (विद्यार्थी) विद्यापीठीय जगताद्वारे प्रगत होतात. म्हणून, औद्योगिक गरजा विद्याविषयक शाखांनी चांगल्या तऱ्हेने जाणून घ्याव्यात.

उद्योगाने उच्च शिक्षणामध्ये प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे गुंतवणूक करावी असे दृष्टीसमोर ठेवले जाते. जेणेकरून उच्च दर्जाचे मनुष्यबळ व संशोधनाचा प्रगत टप्पा निर्माण होईल.

शासनाने, शिक्षण क्षेत्रात गुंतवणूक करण्यासाठी उद्योगाला कर लाभाच्या स्वरूपात प्रोत्साहन द्यावे. अशा प्रोत्साहनांद्वारे आणि योजनांद्वारे विद्यापीठ-उद्योग संशोधन भागीदारीस देखील पाठींबा द्यावा.

**७. स्ववित्तावलंबी आणि आंतरराष्ट्रीय विद्यापीठे : अमर्यादित बदलासाठी एक संधी**

**७.१** खाजगी क्षेत्र कार्यरत राहिल्यास त्याचा स्वतःचा क्षमता विकास प्रभाव हा स्ववित्तावलंबी विद्यापीठांमार्फत उच्च शिक्षण क्षेत्र सुरू करण्याच्या जोखमीपेक्षा मोलाचा आहे. तथापि, भारतामध्ये उच्च शिक्षण क्षेत्रात लक्ष्यित मूल्याच्या ओघासाठी समुचित विधिविधानाद्वारे व विनियमाद्वारे योग्य ती काळजी घेण्यात यावी.

**७.२** अस्तित्त्वात असलेल्या खऱ्याखुऱ्या, अग्रगण्य आंतरराष्ट्रीय विद्यापीठांना प्रोत्साहन देऊन आपण गरजेपेक्षा जास्त दर्जेदार बदल घडवून आणू शकतो. जागतिक उत्तम अध्ययन संस्थांशी आणि त्यांच्या माहितीच्या जाळयाशी जोडले गेल्यास ते फायदेशीर ठरेल.

सुधारित अध्यापनशास्त्र आणि अध्यापन करण्याचा अनौपचारिक दृष्टिकोन हे लक्ष्य असून त्यामध्ये अध्ययन, संशोधन, अभिनव कल्पना व उपक्रमित्त्व या सर्वांचाच समावेश आहे. ही

उपक्रमशीलता परिस्थितीत बदल घडवून आणील यात शंका नाही. मात्र तो बदल योग्य त्या कार्यासक्तीने आणि अपुऱ्या गुणवत्तेच्या व विवेकरहित घटक असलेल्या संस्थांना भारताच्या उच्च शिक्षण विभागात प्रवेश करण्यास प्रतिबंध करण्याकरिता सक्रिय राहून उत्तम काम करण्याची इच्छाशक्ती बाळगून आवश्यक रीतीने विनियमित केला पाहिजे.

**७.३** आणखी एक महत्त्वाची उपक्रमशीलता म्हणजे, कंपनी अधिनियम, १९५६ च्या कलम २५ अन्वये नोंदणीकृत असलेल्या कंपनीला स्ववित्तावलंबी विद्यापीठ स्थापन करण्यासाठी पुरस्कार करणारी संस्था म्हणून परवानगी देणे ही असेल. योग्य दिशेने टाकलेले पाऊल असेल व ते तसे असले पाहिजे. आपल्यासारख्या विशाल व विविधता असलेल्या देशासाठी उच्च शिक्षणाची मोठी मागणी विचारात घेता, आपल्याला सार्वजनिक त्याचप्रमाणे खाजगी निधी पुरविली गेलेली विद्यापीठे, त्या विद्यापीठांवर योग्य ते नियंत्रण ठेवून व समतोल राखून एकत्रित करण्यासाठी प्रोत्साहन देण्याची गरज आहे. या कालावधीमध्ये कोणी उच्च शिक्षणामध्ये खाजगी गुंतवणुकीच्या प्रचालनासाठी विशेष कृतीद्वारे शैक्षणिक कंपन्याकरिता आराखडा विकसित करण्यासाठी विंनती करू शकेल.

**शिफारशींवरील शेवटची टिप्पणी**

उपरोक्त शिफारशी जाणीवपूर्वक स्थूलमानाने मांडण्यात आल्या आहेत. या शिफारशींवर अन्य समितींच्या अहवालांमध्ये खूप खल झाला आहे. विद्याविषयक बाबी, संशोधन, तंत्रज्ञान, अभिनव कल्पना यांबाबत सूक्ष्म दृष्टी ठेवून नेत्यांनी हे काम तपशीलवार तयार केले आहे हे लक्षात घेणे महत्त्वाचे आहे.

या शिफारशी समर्थकारी संरचनेमार्फत पुढे नेण्याची गरज आहे. या समर्थकारी संस्था केवळ सूचना देणाऱ्या व अपरिवर्तनशील अशा नसाव्यात. या पार्श्वभूमीवर काही शिफारशी येथे स्पष्टपणे नमूद करण्यात आलेल्या नाहीत. परंतु अहवालामध्ये त्यावर सविस्तर ऊहापोह करण्यात आला आहे.

ज्ञान अग्रभागी ठेवून त्यासंबंधात काम करणे व ते पुढे नेणे हा आपला उद्देश असला पाहिजे. म्हणून, शासनाने आणि अंमलबजावणी करणाऱ्या संरचनेने आवश्यक रीतीने अग्रगामी असावे व भूतकाळात तसेच गतकाळात अडकून पडू नये.

महाराष्ट्रातील विद्यापीठ यंत्रणा अत्यंत लवचिक, खुली, अध्यापन केंद्रीभूत व देशाला पुढे नेण्यास समर्थ बनेल असावी आणि या देशाचा तरुण प्रदीर्घ काळ जागतिक नेतृत्व देणारा असेल, अशी अशा वाटते.

आज आपण जेथे आहोत तेथून अशा ध्येय्याकडे जाण्याची आपणास गरज आहे. उच्च शिक्षणात सुधारणा करताना ही सत्यस्थिती जाणून घेतली पाहिजे. तीन समित्यांनी एकत्रित प्रस्तावित केलेली उपक्रमशीलता ही अशा प्रकारे व्यवहार्यरीत्या अग्रेषित केली पाहिजे. अन्य दोन विशेषिकृत समित्यांच्या शिफारशींना यासंबंधात विशेष मूल्य आहे.